आचार्य अत्रे यांच्या 'अर्धाङ्गी' या बोलपटाच्या आधारें लिहिलेली

# अर्धाङ्गी

Be courteous!
Live up to the reputation
of a University Student.

लेखक :

श्री० निरंतर, एम्. ए.,
व्हाइस प्रिन्सिपल, गांधी ट्रेनिंग कॉलेज, पुणें २.

१९४०

किंमत १। रुपया

# अर्पण

चित्रपटसृष्टींत ज्यांनीं आपल्या कर्तृत्वानें
'नवयुग' घडवून आणलें आणि आपलें नांव
अजरामर करून आतां एका मोठ्या
संघटनेच्या सहकार्यासाठीं
आत्मसंतर्पण केलें त्या
**'हंस'च्या कलावंतांस**
कृतज्ञतापूर्वक अर्पण.

—निरंतर.

# पहिलें पाऊल



अशोक प्रेस मधून बाहेर पडणारी ही पहिली कादबरी आहे. या पहिल्या कृतीची प्राणप्रतिष्ठा आचार्य प्र. के. अत्रे, हंसचे कलावंत यांच्या साहाय्यानें व श्री. निरंतर याच्यासारख्या नामंवत लेखकांच्या कर्तृत्वाने झाली आहे ही मोठ्या आशेची व अभिमानाची गोष्ट आहे.

या ग्रयाच्या मार्गात क्षणोक्षणी अनत अडचणी उसळत होत्या; परंतु त्याहि सर्व शांत झाल्या व आता फक्त त्यांच्या गोड स्मृति राहिल्या आहेत. पुढील कार्यास हे अनुभव उपकारक झाल्याखेरीज राहणार नाहींत.

' ' अशोक ' ही एक नामवत सस्था झाल्याखेरीज राहणार नाहीं असा आत्मविश्वास प्रथमारभातून वाटत आहे.

वि. धा. मिराशी, प्रकाशक.



# प्रस्तावना

'अर्धाङ्गी' या चित्रपटाचे कथानक सहज एकदा बोलताबोलतां प्रि. अत्रे यांनी सांगितलें तेव्हापासून त्या चित्रपटाचे वैशिष्ट्य माझ्या मनांत होतें आणि ते विस्तृतपणे नमूद झालें पाहिजे असे वाटले.

माझ्या प्रमाणेंच कोणत्याही रसिकाची अशी इच्छा असणार की, तें काम प्रि॰ अत्रे यांनीच केले पाहिजे. सुखाचा शोध, रिकामा देव्हारा ( देवता ) इत्यादि कादबऱ्या त्या त्या चित्रपटकथाना अत्यत उद्बोधक ठरल्या आणि त्या कादबऱ्या हीं त्या चित्रपटाची स्मारकें होऊन गेलीं. त्या कादबऱ्या वाचताना पाहिलेल्या चित्रपटाची आठवण होते. शिवाय कादबरी व चित्रपट हीं दोन्हीही एकमेकाना पूरक ठरतात. प्रि. अत्रे यानीं श्री. खांडेकर याच्याप्रमाणे हा उपक्रम करावा अशी त्यास कित्येकानीं आग्रहाची विनंति केली. परतु सध्या तरी ते कादबरी लिहिण्याइतके 'स्थावर' होतील असे वाटत नाहीं !

मी त्या कल्पनेचा उपक्रम करण्याचे ठरविले व त्यास हसऱ्या विश्वामित्रांनीं अत्यत उदार साहाय्य देऊन पुरस्कार केला. चित्रपट, कादंबरी किंवा ग्रथ हीं माध्यमें एकमेकापासन किती निराळीं आहेत हे या प्रसगीं मला चागले पटले. चित्रपट कथेतील कित्येक भाग काद-बरींत अत्यत अस्थानीं ठरतो. याच्या उलट कादबरीची वैशिष्ट्ये चित्र-पटकथेत येणार नाहीत.

या चित्रपटकथेंत त्या त्या पात्राच्या दृश्य जीवनावरून त्याच्या-विषयीं कांही निश्चित कल्पना होतात. त्या भावनाना मी शक्यतोंवर हात लावला नाहीं. तर हें दृश्य पाहात असतां प्रेक्षकाच्या मनांत ज्या कित्येक सभवनीय प्रसगांची पार्श्वभूमि तयार होत असते. ती पार्श्वभूमि मी स्पष्ट केली आहे. मी जे प्रसंग कल्पिले आहेत त्यासारखे आणखी कित्येक प्रसग असू शकतील. चित्रपटांत दाखविलेले प्रसग हे कांहीं परि-स्थितीच्या पर्यवसानासारखे असतात. ती परिस्थिति विविध आहे. तेव्हा अशा तऱ्हेच्या याच पर्यवसानाच्या आणखीहि कादबऱ्या लिहितां

येतील. त्यापैकींही एक आहे. आचार्य अत्रे याच्या लेखणीचे वैभव मी अलिप्त ठेवले आहे. अतिशयोक्तीने विडंबन करून टीका परिणामकारक करण्याची त्याची ' खास ' पद्धति अनुकरणानें सुद्धां इतरांस येणे शक्य नाही. तरी कांही प्रसगीं मूळ कथेसाठीं मी तसा प्रयत्न केला आहे.

या कादबरींत विशेष काय आहे, हे कळण्याची ज्यांना जिज्ञासा असेल, त्यानीं चित्रपट पहावा निदान चित्रपटकथेचे पुस्तक वाचावें आणि मग ही कादबरी वाचावी.

ही एक नवी प्रथा पाडण्याचे धाडस करण्यात हौस हे मुख्य कारण आहे. चित्रपटाची स्मृति या ग्रथरूपाने वाचकाच्या जवळ राहील असें वाटते.

हे काम सुरू केल्यापासून पुरी करीपर्यंतचा काल फारसा मोठा नव्हता. तरी कांही अनपेक्षित घडामोडीमुळें तो काळ मात्र माझ्या कायमचा लक्ष्यात राहील. त्या घडामोडींतून पार पाडण्यास आचार्य प्र. के. अत्रे यांचे मुख्य साहाय्य झाले. हसचे 'विश्वामित्र' श्री. बाबुराव पेढारकर, यांनींहि या कल्पनेला सक्रिय साहाय्य केले. माझे स्नेही व हससस्थेचे एक कार्यकर्ते श्री. नी. गो. पंडितराव यांच्याहि साहाय्याचा मला भरपूर उपयोग करून घ्यावा लागला.

या योजनेचे कालमाहात्म्य सभाळण्यासाठीं ' अशोक ' प्रेसचे मालक श्री. मिराशी, व्यवस्थापक श्री. दिवाकर यांचे अकृत्रिम साहाय्य झालें.

एखाद्या नव्या कल्पनेला उचलून धरून साहाय्य करणारे इतके साहाय्यक पाहिल्यावर माझ्यासारख्या लेखकास आणखी स्फूर्ति येते की—

पण ते इतक्यांत नको—

पुणे २-४-१९४०.

ग. भा. निरंतर

# अर्धाङ्गी

## एक नवी रूढि

सर्व सामाजिक अन्याय आपल्या चालू परपरागत विवाहपद्धतीतूनच उत्पन्न होतात, असा आजकाल बहुतेकाचा समज असल्यामुळे सर्व सामाजिक सुधारणा विवाहपद्धतीच्या भोवतालीं घोटाळत असतात. सामाजिक नीतिमत्ता वैवाहिक आचारधर्मावर ठरवली जाते. व्यक्तीचे वैवाहिक जीवन रूढ नीतिनियमाप्रमाणे असले तर मग समाज त्या व्यक्तीवर सतुष्ट असतो. मग तो बुद्धीने कसाही असो. तो वाटेल त्या मार्गानें पैसा मिळवीत असो. तो विवाहबाह्य जीवनात अनाचारी कां असेना, ते अनाचार त्याच्या किवा इतराच्या वैवाहिक सबधापासून

अलिप्त असले म्हणजे झाले ! अगदी आदर्श समजल्या जाणाऱ्या जुन्या पिढींतसुद्धा हीच विचारसरणी होती. उपवस्त्र नि अगवस्त्र या गोष्टी कोणाला आश्चर्याच्या वाटत नसत. सांप्रदायिक वैवाहिक जीवनाच्या शेजारींच दुसऱ्याच एकाद्या जीवनाचा प्रवाह वाहत असला तरी समाजात तो पचत असे. एकाच गृहात गृहिणी व विवाहेतर संबंधाची स्त्री या नांदू शकत असत. समाजाने त्या माणसाना त्याबद्दल कधीं त्रास दिला नाहीं. फार काय त्या गृहिणींनीसुद्धा आपल्या पतिनिष्ठेत कधीं कसूर केली नाही. त्या गृहदेवाच्याही पत्निप्रेमात कधी अंतर पडले नाही !

परंतु पुढेपुढे गृहिणींना बाहरचे जग समजू लागले. नुसत्या पतिसेवेवर त्यांचें मन जगेना. त्याना वैयक्तिक जीवनाविषयीं काही अपेक्षा उत्पन्न झाल्या. आर्थिक परिस्थितीमुळे, शिक्षणाचा काल वाढल्यामुळे पाश्चात्य संस्कृतीचा सहवास घडल्यामुळे इ० अनेक कारणामुळे पुरुष बराच काळ अविवाहित राहू लागले. आणि पुरुष बालवयात लग्नास मोकळे नसल्यानें त्याच्या ' नियोजित ' वधूहि प्रौढ होईपर्यंत अविवाहित राहू लागल्या. प्रौढ कुमार व प्रौढ कुमारी यांचा समाजात एक नवा वर्ग तयार झाला व वडील पिढीला त्या वर्गांवर नियंत्रण ठेवणं जड जाऊ लागले. विवाहपूर्व आयुष्यात काही आवडी निवडी पक्या होऊ लागल्या आणि काही निश्चित अपेक्षांनी कुमार व कुमारी विवाहात पदार्पण करू लागल्या !

अशा प्रौढ विवाहांत एकमेकाच्या मतभेदाचे प्रसंग जास्त येणारच आणि त्यामुळें वैवाहिक अन्यायाची किंवा असमाधान याची जास्त तीव्र जाणीव स्त्रियांत व पुरुषातहि उत्पन्न झाली. त्यामुळे विवाहबंधन काही प्रसंगीं असह्य होऊं लागलें आणि तें तर आजन्म लादलेलें ! तेव्हा सगळीकडून वेढणाऱ्या त्या वैवाहिक जीवनतटाला अनाचाराच्या, अत्याचाराच्या चिरा पडू लागल्या ! एकमेकाना विटल्यावर मग जखडल्यासारखें एकत्र राहणें किती असह्य आहे, हें असंतुष्ट विवाहितास वाटूं लागलें.

ह्याच सगळ्यात मोठा सामाजिक अन्याय ! पुरुषाला अनिर्बंध स्वातन्त्र्य आणि स्त्रीला आजन्म पारतन्त्र्य ! त्याना त्या अन्यायास प्रतिकार करता आला पाहिजे. वैवाहिक बधनाचे सरक्षण नाकारण्यात आले तरी जगता येईल असे आत्मरक्षणाचे सामर्थ्य त्याच्यात आले पाहिजे ! आणि हे सामर्थ्य कायदेशीर पाहिजे !

यासाठी विवाहबधन कायदेशीर तोडता आले पाहिजे. आणि ह्मणून ते जोडतानाहि कायद्याचे सरक्षण पाहिजे. या सर्वव्यापी अपेक्षेने राजिस्टर मॅरेजचा कायदा निघाला ! आता सगळे ठीक झाले असे सगळीकडे वाटू लागले.

विवाहबधन हे प्रसगी सोडता येऊ लागल्यावर सामाजिक अन्यायाचा बराच बदोबस्त झाला आणि अरेरावाना जरब बसली !

सुशिक्षित स्त्रिया आर्थिक स्वावलबनाइतके शिक्षण सपादन करून ते हत्यार जवळ ठेऊन त्या विवाहबधनात प्रवेश करू लागल्या. आता पुरुषाला घराची स्वात्री बाळगता येणार नाही. आता गृहसौख्य पाहिजे असेल तर गृहस्वामिनीचे अधिकार मानले पाहिजेत.

वैवाहिक सुख हा आमचा जन्मसिद्ध अधिकार आहे अशी जी पुरुषाची घमेंड होती ती रजिस्टर मॅरेजच्या कायद्याने उतरवली आहे ! आता विवाह हा सलोख्याचा व्यवसाय झाला आहे !

या आपल्या हक्काची जाणीव रजिस्ट्रारच्या ऑफिसमध्ये येणाऱ्या प्रत्येक स्त्रीच्या मुद्रेवर दिसत असते.

---

# पिंजऱ्यांतलें पांखरूं

## प्रकरण १ लें

सत्यवान् रजिस्ट्रार ऑफिसमधला एक साधा कारकून. त्याचा पगार इतर कारकुनाइतकाच. त्याचा सामाजिक दर्जाहि इतरांइतकाच. परंतु त्याचे मानसिक जीवन मात्र इतर कारकुनापेक्षा फार निराळे होते !

आपल्या विवाहाची नोटीस देण्यासाठी ज्यावेळीं प्रौढ कुमार नि कुमारी त्या आफिसमध्ये येत. त्यावेळीं त्याला स्वतःविषयीं एकदम भलतेच महत्त्व वाटू लागे. सर टामस् मन्रो जहांगिरकडे गेला, त्यावेळीं जहांगिरला जे वाटले असेल, वास्को-डि-गामा झामोरिनकडे गेला, त्यावेळीं झामोरिनला जे वाटलें असेल, तसे कोणी नोटीस द्यावयास आल्यानंतर त्याला वाटत असे !

आणि " लेकानो ! आमच्या मंजुरीखेरीज तुम्हाला रूढीच्या कैदेतून सुटतां येणार नाही ! " असे आपल्या मित्रमंडळींत प्रौढ वधूवरांना उद्देशून सत्यवान् नेहमी बोलत असे.

आपल्या स्थानमहात्म्याची भरपूर जाणीव त्या प्रौढ वधूवरांना दिल्याखेरीज सत्यवानाने त्यांचे काम कधी केलं नाहीं !

ते खरेच स्थानमाहात्म्य होते. त्याला विवाहनोंदणी कचेरींत जागा मिळाली, ती कांहीं त्याच्या सामाजिक सुधारणेच्या विचारांचे बक्षिस म्हणून मिळाली नव्हती. त्याला त्या सुधारणेचा गंधही नव्हता. त्याचे जीवन अनंत बंधनांनी जखडलेले होतें. आणि त्या बंधनांशीं झगडण्यासाठी तो ज्या अनंत धरपडी करी, त्यांतलीच एक धरपड म्हणजे ती नोकरी होती. रजिस्ट्रार ऑफिसमध्ये नोकरी मिळण्याऐवजी त्याला एखाद्या म्युनसिपालिटीत उंदरांचे सांपळे वाटण्याची नोकरी मिळाली असती तरी तीहि त्याने केली असती. त्याच्या इच्छेचा जीवनाशीं बालविवाह झाला होता. जीवनाच्या गरजा भागविणे हा त्या इच्छेचा पतिव्रताधर्म होता.

त्याच्या इच्छेचीं सारीं पिसे झडून गेली होतीं. [परिस्थितीच्या पिंजऱ्यात अडकल्यामुळे त्याची इच्छा सारखी चरफड करी. पण पूर्णपणें उभारण्यासहि तिला त्या पिंजऱ्यांत जागा नव्हती. त्याची इच्छा पण फडफडत, आपल्याच चोचींने पिसे उपटीत, पोटाचे चावे घेत, हाता-पायांना कडकडून डसत दिवस कंठीत होती.]

त्याच्या बरोबर शिकलेले, खेळलेले, शाळा सोबती निरनिराळ्या क्षेत्रात स्वैर विहार करीत होते, आणि सत्यवान्—एक म्हातारी आई—तिने गळ्यात बांधलेली एक बायको सावित्री याच्यासह एका खुराड्यांत जगत होता.

सुशिक्षिताच्या जगाविषयी त्याला कधी लोभ वाटे, कधी मत्सर वाटे. कधीं तिरस्कार वाटे. स्वतःचे सुख सिद्ध करण्यासाठीं सुशिक्षितावर तोंडसुख घेण्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता. म्हणून तो त्याच्याबद्दल नाहीं नाही त्या कंड्या उठवून रसभरित वर्णन करीत असे. आणि त्या कंड्यापैकीं पुष्कळशा कंड्या त्याच्या वैवाहिक जीवनाविषयीच्या असत. " त्याचे पटत नाही !" हे त्याचे ठरलेले अनुमान असे. आणि स्वकल्पित अनुमान सिद्ध करण्यासाठी तो वाटेल त्या प्रसंगाच्या हकीगती बोलता-बोलता जुळवीत असे.

एखाद्याला वाटेल याला ते सगळे एकदम नापसंत असेल. परंतु त्याला स्वतःला त्या जीवनाबद्दल अत्यंत लोभ होता. निदान हे तरी मिळावयास पाहिजे होते, अशी तो आपल्या नाठाळ दैवाजवळ कुरकुर करी.

कोणी विवाह नोंदण्याची नोटीस देण्यास आला की, सत्यवान् आपल्या चष्म्याच्या कांचेच्या कडावरून त्याच्याकडे पहात राही.

त्या जोडप्याचे तारुण्य, उत्साह, सामाजिक, मताविषयीची बेफिकीरी, काहीं तरी मोठा पराक्रम केल्याची ऐट, ही पदोपदी व्यक्त होत.

अडवतील तर देव तरी ! झगडू त्याच्याशी—अशा आविर्भावानें जणुं ते त्या ऑफिसात प्रवेश करीत असत.

पहा आम्ही रूढींतून सुटलो. वाडवडिलांना धुडकावले, धर्माला गप्प बसविलें–असा भाव त्याच्या चेहऱ्यावर सत्यवानास दिसे.

आणि त्यावेळीं सत्यवानास आपले वैवाहिक जीवन आठवे. जीविताकडे पाठ फिरवून बसलेली म्हातारी आई आणि जीविताविषयीं काहीही कल्पना नसलेली सावित्री ! आणि त्याच्या पोटाची सोय करण्यासाठी कारकुनी करणारे आपण !

या विवाहिताचे रजिस्टर्ड जीवन आणि आपले नॉटपेड जीवन !

तो असाच विचार करीत तेथे बसून राही. विवाह नोंदणीचे ऑफिस म्हणजे कांही देवीच्या साथीतले देवी टोचण्याचे ऑफिस नव्हे ! तेथे केव्हां तरी चार दोन माणसे येणार ! त्यामुळे सत्यवानास विचार करण्यास भरपूर वेळ मिळे.

तो एक दिवस असाच विचार करीत बसला होता. इतक्यात ऑफिसच्या दाराशी मोटार थाबल्याचा आवाज ऐकल्याने तो 'जागा' झाला.

मोटार मधून येणारे लोक म्हणजे काही ठराविक असावयाचे. सौंदर्यसपन्न तरुणी व यौवनविभूषित तरुण हसत खिदळत यावयाचे. ती उत्पादक वेषभूषा, ती स्वास्थ्यभजक बेफिकीरी, तो दुसऱ्यास सकुचित करणारा निःसकोची स्वभाव ! रानची पाखरे जणु काय !

पण त्या मोटारमधून मात्र तसे कोणी उतरले नाही. उतरलेली माणसे पाहिल्यावर हे दोघेजण आपल्या विवाहाची नोटीस देण्यास आलेल्यापैकीं आहेत की, आपल्या मुलाच्या लग्नाची अक्षत देण्यास आलेले आहेत असा सत्यवानास भ्रम पडला.

असा भ्रम पडण्याचे कारण मोटारीतून आधीं बाहेर पडलेली स्त्री–स्त्रीच ती–तरुणी खास नव्हे, अरुधती सत्यवानास पूर्वपरिचित होती.

अरुधतीला पाहिल्याबरोबर सत्यवानास एकदम १० वर्षांपूर्वीचा काळ आठवला. त्याच्या जीवितग्रथाचे चालू पान एकदम मिटून १० वर्षांपूर्वींची पाने त्याच्या डोळ्यासमोर नाचू लागली.

त्याच्या कॉलेजच्या जीवनातले दिवस होते ते ! त्याचे वडील त्यावेळीं

ह्यात होते. मुलाच्या शिक्षणानंतर आपली सांपत्तिक स्थिति सुधारेल• या आशेने त्याच्या वडीलांनीं मोठ्या कष्टाने त्याचे शिक्षण चालू ठेवले होतें. सत्यवानानेहि वडिलांची इच्छा महत्त्वाकांक्षा म्हणून पुढे ठेवली होती. अहोरात्र तो अभ्यास करी. आणि त्याने विद्वत्तेबद्दल कॉलेजात लौकिक मिळविला होता. त्याच्या भोंवताली कॉलेजातील फुलपाखरें बागडत होती. त्यावेळीं तो मधुमाक्षिकावृत्तीने अध्ययन करीत होता.

कॉलेजातल्या विद्यार्थिनी—! सत्यवान् नुसता 'आ' करून पहात राही त्यांच्याकडे. तारुण्यसंपन्न विद्यार्थिनी आपल्या पोशाखपद्धतीने जास्त भडकपणे तरुण दिसत. आणि त्या विद्यार्थ्यांत हालचाल करू लागल्या कीं, विद्यार्थ्यांची मने अंगावरून वारा गेल्यासारखी पाघळून जात! आणि भोंवतालच्या विद्यार्थ्यांना अशा रीतीने मंत्रमुग्ध करण्यात विद्यार्थिनींना मोठा पराक्रम वाटे! अनपेक्षितपणे एकदम एखाद्या विद्यार्थ्यास कांही निमित्ताने हाक मारणे, त्याच्याशी चार चौघांत बोलत उभे राहणे आणि अशा वेळी त्या विद्यार्थ्याविषयी बाकीच्या विद्यार्थ्यांना जे कांही वाटे त्याची जाणीव होऊन तो विद्यार्थि अर्धमेला होऊन गेलेला पाहणे, खोट्या आशा उत्पन्न करणे, इत्यादि पोरखेळ त्या विद्यार्थिनी करीत आणि विद्यार्थ्यांच्या बेडकासारख्या जिवाचे हाल करणे हे या विद्यार्थिनींचे हौशीचे खेळ असत! दिवसभर त्यांचे हे खेळ चालत आणि त्यापायी विद्यार्थ्यांचा क्षणोक्षणीं जीव कासावीस होई!

सत्यवान् या प्रकारापासून अलिप्त राही. कारण त्यामुळे मनाची होणारी व्यग्रता त्याला असह्य होई. आपल्याला ते खेळ परवडणार नाहीत, असे वाटून तो आपले तरुण मन खेचून पुस्तकाखाली दडपून टाकी. तरी त्याच्या मनाची ओढ त्याला अस्वस्थ करी आणि शेवटी युवतीसहवासाची तळमळ तो युवतीदर्शनावर भागवून नेई! परंतु ते कोणालाहि कळू न देतां. विद्यार्थिवर्गांत त्याचा लौकिक असा कीं, सत्यवान् म्हणजे एक शुकाचार्य आहे! अंदरकी बात सत्यवान जाणत होता•

इतकें जपूनही एक दिवस त्याच्यावर एक प्रसंग ओढवलाच! तोच प्रसंग अरुंधतीस पाहिल्याबरोबर त्याला आठवला!

कॉलेज सुटून बराच वेळ झाला होता. सत्यवान् वाचनालयात वाचीत बसला होता; त्याला कल्पनाही नव्हती कीं, अरुंधती वाचनाल्याच्या दुसऱ्या दालनांत वाचीत बसली असेल. ती पुष्कळ वेळां वाचनाल्यांत बसे. ती हुशार होती. तिला वाचनाची खूप हौस होती. अगदीं पुरुषी हौस होती. प्रोफेसरांचें तिच्यावर विशेष लक्ष होते. कॉलेजच्या कीर्तीत भर घालणारी एक विद्यार्थिनी आणि त्यातही 'विद्यार्थिनी' या दृष्टीने तिच्याकडे सर्व प्राध्यापक पहात. विशेषतः संस्कृतमध्ये तिचें प्राविण्य हा एक विशेष कुतूहलाचा विषय होता.

कॉलेजच्या ग्रंथालयांतील खास ग्रंथ तिला मिळत. ते गंभीर ग्रंथ ती वाचते म्हणून विद्यार्थ्यांना जास्तच वाटे.

याखेरीज तिचा मनमोकळेपणा ! सायकलवर बसून ती मोठ्या वेगाने जाई. केव्हाहि पहा—ओळख असो नसो, तिचें अर्धस्फुट हसू कोणासही पहावयास मिळे. गर्दीचा तिला संकोच नसे. विद्यार्थ्यांच्या मनात तिने आपल्याविषयीं भलते अंदाज वाढू दिले नाहींत. सर्वांशी आणि कोणाशींहि बोलण्याची तिची तयारी. तिचा परिचय, निदान बोलणे चालणे इतकें सुलभ असताहि तिच्याशीं न बोललेले असे कांहीं विद्यार्थि होतेच. सत्यवान् त्यातला एक !

त्या दिवशी त्याचा तो नियम मोडला. तो ग्रंथालयातून बाहेर पडावयास आणि अरुंधतीहि बाहेर पडावयास एकच गांठ पडली.

... एका वर्गांतले दोघेजण. दोघांनाहि एकमेकाची हुशारी वगैरे माहिती. दोघेहि एकमेकाविषयी पण तिऱ्हाइताशीं बोलणारे. आणि दोघेहि, निदान सत्यवान् तरी अरुंधतीविषयीं विचारहि करणारा ! परंतु ती इच्छा त्यानें मनांत अगदीं खोल खोल ठेवून दिली होती.

अशा स्थितींत दोघेहि अचानकपणे समोरासमोर आले. दोघांनींहि एकमेकाकडे पाहिले—नंतर हसू. नंतर अरुंधतीनेंच विचारलें—

" काय, इतका वेळ बसला होतात ? "

सत्यवानाजवळ तेवढाच प्रश्न विचारण्यासारखा होता. तोच अरुंधतीनें संपवल्यामुळे त्याची तारांबळ उडाली.

" हो. मी दररोज बसतो."

" हो खरच ! स्कॉलर लोक तुम्ही !"

आणि हे अत्यंत साधे वाक्य पण एका कॉलेजच्या विद्यार्थीनीनें एका विद्यार्थ्यास, पहिल्याच भेटींत, तेहि पुन्हा—कोणीहि आसपास नसताना आणि प्रसंगहि नसताना म्हणणे—म्हणजे ते साधें वाक्य रहात नाही. आणि हे उच्चारताना ते विशेष तऱ्हेनें पाहणे !

सत्यवान् फारच गांगरला. तो इकडे तिकडे पाहू लागला. समोर क्रीडांगणाच्या काठावर एक टोळकें होतें. त्याच्याकडे पाहून मग सत्यवान् जरा धीटच झाला. " काय वाटेल ते म्हणा लेकानो ! यांत काय आहे ? मी काय हिच्यासाठी येथे थांबलो नव्हतो. आणि ती सगळ्यांशींच बोलते !" वगैरे विचार जमवून अनाहूतपणे तो स्वतःशीच स्वतःचें समर्थन करीत होता.

त्याने जरा धीर जमवून उत्तर दिलें.

" आम्हीं कसले स्कॉलर ! स्कॉलरशिप नसलेले स्कॉलर आम्ही. स्कॉलर तुम्ही !"

" हो. वक्ते आहात खरे."

( सत्यवान्‌ला एकदा वक्तृत्वाचे बक्षिस मिळालें होतें. त्याला उद्देशून वरील वाक्य होत. )

सत्यवान् नुसता हसला आणि नंतर ५।१० मिनिटें सायकलस्टॅडपर्यंत दोघेहि बोलत गेले आणि सत्यवानाने काही तरी निमित्त काढून मुद्दाम सायकल दुसरीकडे वळविली. त्याने सायकलच्या रूपाने आपले ओढाळ मनच खेचलं.

त्यादिवशी त्याला काही निराळेच वाटले. त्या वाटण्याची अगदीं मनोराज्यें तयार झाली. त्या मनोराज्यात तो अरुंधतीसह भटकूनहि आला.

परंतु त्या दिवसानंतर अरुंधतीशीं बोलण्याची त्याला कधी संधीच आली नाहीं. त्याला धीर झाला नाहीं.

त्या नतर—कितीतरी घडामोडी झाल्या. अरुधतीबद्दल सत्यवानास मधून मधून माहिती कळे. ती एम्. ए. झाली. बी. टी. झाली. परगावीं गेली. परप्रांतात गेली. येथपर्यंत कळले. आणि आतां तिचे लग्नही झाले असेल असें त्याला नक्की वाटू लागले.

सत्यवान् त्या दहा वर्षांत त्या कचेरीपर्यंत येऊन पोहोचला होता. कारकून झाला होता. रजिस्टर मॅरेजच्या नोटिसा खरडणे, प्रसगी साक्षी-दार होणे वगैरे कामे करू लागला होता. हळूहळू कॉलेजचे जीवन मनात पुसट झाले होते. ते सर्व जग सोडून तो समव्यवसायी लोकाच्या जगात स्थायिक झाला होता.

आपण गरीब होतो तरी एक स्कॉलर विद्यार्थिनी स्वतःहून आपल्याशी बोलली ही गोष्ट तो शक्य तितकी गोडस करून इतरास सागत असे. यापलीकडे त्या प्रसंगाचे काहीहि महत्त्व त्याच्या जीवनात उरले नव्हते. आपणास प्रेमविवाह करता आला नाही याबद्दल त्याला कधी कधी तीव्र दुःख होई. पण आपण मनात आणले असते तर सहज तसे करता आले असते या अदाजावर तो ते दुःख विसरून जाई.

ते दुःख, ती आठवण अरुधतीने दगड मारलेल्या मोहोळासारखी उठविली.

अरुधती आणि रजिस्टर मॅरेज ऑफिसात ! आणि नतर एक बराच पोक्त गृहस्थ मोटारीतून खाली उतरला. गोपाळ कृष्ण गोखल्याच्यासारखा पोषाख होता त्याचा. हातात एक जाडा ग्रथ होता.

नंतर आणखी एक गृहस्थ उतरला. त्याने प्रोफेसर कॉलेजच्या बाहेर खाजगी जीवनांत जसा पोषाख करतात तसा पोषाख केला होता. म्हणजे लाब कोट, घडीची टोपी, सोनेरी चष्मा, काचा मारलेले धोतर व वहाणा. दाढी मात्र त्याच दिवशी केलेली. निमगोरेपणामुळे काही लोक विद्वान् दिसतात तसा तो दिसे. एखाद्या सौम्य कार्यक्षेत्रांतला चिटणीस असावा तसा तो दिसला.

अरुधती सरळ रजिस्ट्रारसाहेबाकडे गेली. सत्यवानासहि बरें वाटले.

तिच्या जीवनास वैभव चढलेले व आपण कारकून ! ‘ बरे झालें भेटली नाहीं ’ असे सत्यवानास वाटले.

“नमस्कार ! ” अरुंधती समोर बसलेल्या रजिस्ट्रारकडे पहात म्हणाली. तो म्हातारा खाली मान घालून काहीं खरडीत होता. सामाजिकसुधारणेला कसून विरोध करणाऱ्या पिढींतला माणूस त्या सुधारणेच्या केंद्रस्थानी बसला होता.

त्याने नमस्कार ऐकल्यावर मान वर केली. डोळे भुवयापर्यंत चढवले. आणि तरुण सुशिक्षित स्त्री समोर पाहिल्यावर हसून नमस्कार केला !

“ नमस्कार ! ”

अरे ! कोण आहे ?´एक नोटिशीचा फॉर्म आण–

“ बसा–”

“ अरुंधती बसत म्हणाली–

‘ नोटीस दिली आहे. रजिस्ट्रेशनचा फॉर्म पाहिजे. ”

“ ओ ! आय सी ! पण–” या तरुणीचा जोडीदार इकडेतिकडे शोधक नजरेने पहात रजिस्ट्रारसाहेब म्हणाले.

“ दोघेहि आलोत. ”

इतक्यात तो पोक्त गृहस्थ आला.

‘ हे मिस्टर वसिष्ट ! ”

“ नमस्कार. ”

वसिष्ठाचे तिकडे लक्ष नव्हते. त्याच्या हातातल्या ग्रंथावर “ मुडकोपनिषद् ” अशीं मोठीं अक्षरे दिसत होतीं. तो वसिष्ट मुनि अद्याप मायाप्रांतात आला नव्हता.

ग्रंथ मिटून तो बसला आणि रजिस्ट्रारकडे पहात म्हणाला. “चला. आटपा लवकर. मला काम आहे. ”

“ कोण–कोण–” रजिस्ट्रारला विचारल्यावाचून राहवेना. हा मुनि या युवतीशी विवाह करणार कीं काय ? आणि हा जरठ–कुमारी विवाह रजिस्ट्रार पद्धतीने होणार ? त्या वृद्धालाही फार आश्चर्य वाटले.

परंतु अरुंधतीस ते त्याचे बोलणे आवडले नाही. ती जरा चिडून म्हणाली—" मी मिस् अरुंधती व हे मिस्टर वसिष्ठ—आमचा विवाह नोंदावयाचा आहे."

अरुंधती—आणि मिस्—सत्यवानास आश्चर्याचा धक्का बसला.

आणि मिस्टर वसिष्ठ पाहिल्यावर तर तो सर्दच झाला. " प्रेम आंधळे असते ते असे ! बरं झालं, आपण या विदुषीच्या नादीं लागलो नाही." असे मनात म्हणत तो मिस्टर वसिष्ठाच्याकडे पाहू लागला. हा निर्गुणनिर्विकार परमात्मा व ही सर्वगुणसंपन्न माया—असेंहि त्याच्या मनात आले.

रजिस्ट्रार म्हणाले—"पण साक्षीदार ?"

इतक्यात तो मघाचा तिसरा मोटारउतारू पुढे आला.

" मी तेवढ्यासाठीच आलो आहे."

" आपण विधवाविवाह मंडळाचे चिटणीस ना ?"

" हो. गेल्या वार्षिक समारंभास आपण आला होता.

" हो. हो." आपला विधवाविवाह या तिऱ्हाइतास कळल्याबद्दल रजिस्ट्रार साहेबांना जरा राग आला, पण तो लपविण्यासाठीं ते विनोद करीत म्हणाले,

" पण पुन्हा मी विधुर तो विधुरच !"

काय भयंकर विनोद होता तो ! काय उत्तर द्यावे विधवामंडळाच्या चिटणीसाने ? तो बिचारा नुसता हसला.

रजिस्टरलग्नास विधवाविवाहमंडळाच्या चिटणीसाची साक्ष ! फार काय रजिस्ट्रार विवाहपद्धतीच्या एका प्रसंगीं तर एक मुसलमान रजिस्ट्रार असल्याचें सांगतात. गणगोत्र यांचे सुद्धा ओवळे ज्या पद्धतीला खपत नव्हते त्या विवाहपद्धतीला, सुधारणेने कौरवसभेतील पांचाळी करून टाकलें आहे, असे त्या आर्यपद्धतीच्या अनुयायास वाटल्यावाचून रहात नाहीं !

डॉ. वसिष्ठ अद्याप आपल्या उपनिषदाच्या तंद्रींतून बाहेर आलेच नव्हते. अरुंधतीला त्यांचा तो स्वभाव चांगला परिचित होता. परंतु चार

लोकांच्या देखत त्यानीं आपल्या वेदांतप्रेमाचें असे प्रदर्शन करावें आणि तेंहि स्वतःचा विवाह रजिस्टर करण्याच्या वेळी, याचे अरुंधतीस वाईट वाटलें, राग आला.परंतु तरी तिने तो राग मुळींच दाखवला नाही. एखाद्या तिऱ्हाइतास डॉ. वसिष्ठाकडे पाहून असे वाटलें असते कीं,ही बाई वसिष्ठाशी लग्न करण्यास आली नसून वसिष्ट हिचें लग्न जुळवून देण्यास आला आहे.

सत्यवान् हे सगळे दुरून पहात होता. प्रेमी माणसे रजिस्टरविवाह करतात. रजिस्टर विवाह हा सहवासोत्तर विवाह असतो अशी त्याची ऐकीव माहिती होती. त्याने कित्येक प्रेमवीर व त्यांच्या रमणी पाहिल्या होत्या. आणि आताचे हे जोडपे तर कांहीं निराळेच होते. अरुधती इतकी अस्सल युवती आणि तिचें या महर्षीवर प्रेम बसले ! कसे जमले असेल हे प्रेम ! त्याचा सहवास कसा झाला, त्या सहवासाची विवाहापर्यंत ओढ वाटण्यासारखें वसिष्ठात अरुधतीला काय दिसले ? प्रेम आंधळे असते, असे काव्यात लिहिलेले असते. हे इतके खरे आहे काय ?—

आणि शेवटी सत्यवानास इतके वाटले कीं, अरुधती इतकी साधी भोळी आहे, हे आपणास कळल असतं तर—पण जाऊ द्या ! बायका त्या बायकाच ! आणि पुन्हा आधुनिक बायका या ! विचारले तर उद्धट म्हणावयाच्या, न विचारले तर भेकड म्हणावयाच्या !

सत्यवानाचें असें हे भ्रमण चालले होते. इतक्यात त्याला रजिस्ट्रार साहेबांनी हाक मारली.

तो ताडकन् उठला. साहेबापुढे जाऊन उभा राहिला.

" साक्ष देता का ? "

" आपण सांगत असाल तर देतो. "

" एक साक्षीदार कमी आहे, तुम्ही ओळखतां का यांना ? "

" यांना नाही. पण ( अरुधतीकडे पहात ) यांना ओळखतो. "

सगळ्यांना आश्चर्य वाटले. अरुधतीची व सत्यवानाची ओळख !

अरुंधती दचकून पाहू लागली. आणि क्षणभर दोघांची डोळेभेट होतांच म्हणाली—

" ओ ! आय्. सी. ! तुम्ही कॉलेजांत— ! "

" हो ! हो ! आपण एका वर्गांत होतो. पण आम्ही पडलो पुरुष विद्यार्थि. चालायचेच हे. विद्यार्थि आणि विद्यार्थिनी यांचे अत्यंत विषमप्रमाण याला जबाबदार आहे. "

" म्हणजे ? हे लोकसंख्याशास्त्र काय काढलंत तुम्ही ? "

" शास्त्र नाहीं, व्यवहार आहे. कॉलेजात मुली थोड्याच असतात आणि त्यामानाने मुलें कितीतरी. सगळ्या मुली सगळ्या विद्यार्थ्यांना माहीत असतात. परंतु कित्येक विद्यार्थि मुलींना माहीतहि नसतात. पुन्हां मुली त्या—कॉलेजातल्या मुली—कोण ओळखणार नाहीं तुम्हाला ?"

" अद्याप कॉलेज बरेंच शिल्लक आहे तुमच्यात. अगदीं ताज्या आठवणीसारखे सांगतां तुम्ही. बरं ! माझी आठवण ठेवल्याबद्दल आभार मानते अं ! अन् एक विनंतीहि—"

" हो मान्य आहे. अगदी साभिनंदन मान्य. "

" थँक् यू ! " अरुंधती डॉ. वसिष्ठ यांच्याकडे वळून म्हणाली—

" हे मिस्टर सत्यवान् ! आमच्या वर्गांत होते. फार हुशार म्हणून यांची कीर्ति होती. खरंच, सत्यवान् तुम्ही एम्. ए. ला जावयास पाहिजे होतें ! "

" मग तुमची भेट कशी झाली असती येथे ! अन् तुम्हाला साक्षी-दार कसा मिळाला असता ? "

डॉ. वसिष्ठ नुसते बघत होते. त्यांच्या वेदांतवाचनाने जड झालेल्या चेहऱ्यावर कांहींही विचार दिसत नव्हते. त्यांनी फक्त नमस्कार केला आणि सत्यवानास काय विचारावे याचा ते विचार करूं लागले.

" हे डॉ. वसिष्ठ ! एम्. ए. पीच्. डी. अमेरिकेंत वेदांतविषयावर यांनीं डॉक्टरेट मिळविली. हिंदुस्तानांत आल्यावर मी बनारसला होतें. त्यावेळीं एक ग्रंथ लिहिण्याच्या निमित्ताने आमचा परिचय झाला. "

आपला जोडा असामान्य दिसतो. त्याचे समर्थन करण्यासाठीं अरुंधतीने हे बनवून सांगितले होते. पुन्हा कोण खरेखोटे तपासणार आहे असे तिला वाटले.

" आणि त्या ग्रंथाची ही पुरवणी वाटत ! " सत्यवान् म्हणाला.

" की शुद्धिपत्र ? " विधवा विवाहमंडळाचे चिटणीस झेंड. मारुतिराव म्हणाले. तरी कोणी हसेना. म्हणून ते आपली कोटी समजावून सांगण्याच्या बेतात होते. परंतु त्या वेदांततीर्थांनीं ते काम पूर्ण केले.

" अहो ! विधवाविवाह हे विवाहाचे शुद्धिपत्रच आहे. "

अरुंधतीस आपल्या प्राणनाथाचे हे प्रलाप आवडले नाहींत व त्यानंतर त्यांना संभाषणासाठीं तिने उत्तेजन दिले नाहीं. हे डॉ.वसिष्टाचे वर्तन पहात असतां सत्यवानाच्या मनात एकच विचार वारवार डोकावत होता. तो म्हणजे—" या माणसावर अरुंधतीचे प्रेम बसले ? "

डोक्यात पूर्व आयुष्यातील स्मृतींचा गोंधळ चालू असताना सत्यवानाने रजिस्ट्रेशन फॉर्मवर सही करण्यासाठीं, तो फॉर्म पुढे ओढला आणि अगदी चुकून तो डॉ. वसिष्टानी जेथ सही केली तेथंच—ती जागा कोरीच आहे असे समजून तेथंच टाकाचे टोक टेकूं लागला. इतक्यात रजिस्ट्रार ओरडले " अहो ! शुद्धीवर आहात का ? खालीं खाली—"

सत्यवान् अगदी खजिल झाला. पण तरी तो आपली चूक सावरीत ओरडला—" हो. मला माहित आहे साहेब. माझी काय ही पहिलीच साक्ष नाही. साक्षी घालण्याचेच काम आहे माझे. मला माझ्या सहीची जागा चांगली माहीत आहे. "

" नाहीं. सत्यवान् मी तुम्हांला फॉर्म देतों. तेथे तुम्हाला वरती सही करता येईल. "

" कशाचा फॉर्म ? "

विधवाविवाह मंडळाचा फॉर्म बाहेर काढीत झेंड्. मारुतिराव

म्हणाले. " हा घ्या. आत्ताच भरून टाका. अहो ! तुमच्यासारख्या तरुणानींच तर हीं कामे करावयाचीं. "

मारुतिरावच्या अकलेचे हें उड्डाण पाहून सगळे थक्क झाले. सत्यवान तो फॉर्म सरकावीत म्हणाला. " आमचे हे नाहीं पण असले कार्य, तरुणपणापूर्वींच होऊन चुकले आहे. माझे लग्न झाले आहे. "

" असं का ? वा : ! अभिनंदन करतो. पण मी म्हणतों, तरी आपला भरलेला असू द्यावा. "

" काय म्हणता काय ? काही वाटते का तुम्हाला ? जनाची मनाची जरा. आटपा लवकर. हे काय तुमचे ऑफिस समजलात तुम्ही ? " रजिस्ट्रार खेकसल्यामुळे मारुतीरायानीं आपले वि. वि. मंडळाचे दप्तर आवरले.

सर्व मंडळी उठू लागली. इतक्यात सत्यवान् काहींतरी आठवल्या-सारखें करून एकदम उभा राहिला.

"एक मिनिट हं ! "

त्या दिवशी शनिवार असल्याने सत्यवानाने शनीसाठीं एक दोन आण्याचा हार घेऊन टेबलात ठेवला होता. त्याने पळत जाऊन तो हार आणला आणि आपल्या खोलीतल्या दत्ताला घातलेला एक शिळा हारहि काढून घेतला.

दोन हार दोन्ही हातात धरीत तो पळतपळत आला. आणि ते चटकन् अनुक्रमे अरुंधती व डॉ. वसिष्ट यांच्या गळ्यात टाकून तो टाळी वाजवू लागला.

" या प्रसंगी खरं म्हणजे कांहीं बोलायलाच पाहिजे. पण मला कांहीं सुचत नाहीं. मी एवढेच म्हणतो. असे प्रसंग वारंवार —"

" शुः ! शूः ! सत्यवान्—! " अरुंधती ओरडली.

सत्यवान् एकदम थांबून अरुंधतीकडे पाहू लागला. काय चुकले त्याला कळेना. परंतु त्याला गप्प बसणे भाग पडले. त्याचा चेहरा

ररकन् उतरला. त्याने हस्तादोलनासाठीं हात पुढे केला आणि अरु-
ातीने तो स्वीकारला. त्यावेळीं त्याला जरा बरे वाटले. तो हस्तस्पर्श हा
याच्या जीवनातला परस्त्रीचा पहिला स्पर्श होता. त्याच्या अंगावर
ामाच उभे राहिले. डॉ. वसिष्ठांशींहि त्यानें हस्तादोलन केले. परंतु तो
ानावर नव्हता. मोटार सुरू झाली. सत्यवान् दाराशी उभा होता.
याच्या चेहऱ्यावर कांहीं निराळेच हास्य दिसत होते. डोळे कांही
अननुभूत अनुभवाने चमकत होते.

इतक्यात अरुंधतीने त्यास हांक मारली—"सत्यवान्!"

तो जवळ गेल्यावर—

"हे पहा—संध्याकाळीं आमच्या घरीं फराळाला यायचं हं! न
विसरता!"

सत्यवानाचा कंठ इतका दाटून आला कीं, त्याला होहि म्हणवेना.
याने नुसती मान डोलावली.

मोटार निघून गेली. सत्यवान् ऑफिसच्या पायऱ्या हळूहळू चढू
लागला. त्याच्या डोक्यात ती अरुंधतीने जाताना मारलेली हाक घोंघावत
होती

"सत्यवाऽन्!"

तोहि स्वतःशीं म्हणू लागला "सत्यवाऽन्"!

त्याच्या सहकाऱ्यानीं त्याची तंद्री लागलेली पाहून हाक मारली—

"सत्यवान्! अहो! आहे बुवा! सत्यवान्!"

सत्यवानास त्याचा राग आला. तो चिडला. "काय हो! फार
पाघळलात!"

"अरे बाबा, आम्ही कोठे होतो कॉलेजात? आमच्याशी कोण
करतो हस्तादोलन?"

"अलबत् पैसे खर्चावे लागतात."

"कशाला? हस्तादोलनाला?"

"नाहीं. कॉलेजात जायला! एम्. ए. आहे ती!"

" अस्स ! "

" तुम्ही लेकांनो, ताना घेत एकाच परीक्षेचे कडवे घोळणारे ! "

" मग तुम्ही कां नाही एम्. ए. ला पत्करलीत ? "

" शिकलल्या मुलीशी आपल्याला विवाहच करावयाचा नव्हता माझी बायको कांहि ढ नाहीं. पण शिकलेलीहि नाहीं. "

" म्हणजे ? "

" बी. ए., एम्. ए. नाहीं उगाच ! "

" मग शिकलेल्या बायका काय फक्त हस्तांदोलनाला ! "

" शट् अप ! माझ्या सहाध्यायिनींचा उपमर्द आहे हा ! "

" हो—हो—" मोठ्याने हसू उधळींत सर्वजण आपापल्या कामाला निघून गेले ! सत्यवान् त्या दिवशीं काहीं निराळ्याच तंद्रीत घरीं गेला.

---

# सौभाग्यवती



## प्रकरण दुसरें

सावित्रीच्या जीवनांत सासू आणि सत्यवान् ही दोनच दालने होतीं. सत्यवान् घरी असला कीं, ते दालन, तो नोकरीवर गेला कीं सासू हे दालन. तिचा विवाह झाला हेसुद्धा तिला दुसऱ्या कोणी तरी सांगित-ल्यावर कळले असावे. आपल्या आयुष्यात वैवाहिक आयुष्याने झालेला बदल कळण्याइतके तिचे मन चौकस नव्हते. तिच्या वृत्तीच्या स्त्रियांना लहानपणापासून माहेर या कल्पनेपेक्षा सासर या कल्पनेचीच जास्त स्पष्ट जाणीव दिलेली असते. मुलीला कळावयास लागल्यापासून तिची प्रत्येक हालचाल सासरी कशी दिसेल, अशा दृष्टीने तिचे आईबाप पाहू लागतात. त्यामुळे सासर ही काय चीज आहे याचा परिचय त्या मुलींना लहानपणापासून झालेला असतो. आपल्या सुखसोईची माहिती होण्यापूर्वीच सुखाचा त्याग करण्याची तिला सवय लागते. आपली इच्छा बोलून दाखविता येऊ लागण्यापूर्वीच ती दडपून टाकण्याची तिला सवय लागते आणि सासरी जाण्यापूर्वीच स्वतःचे व्यक्तित्व ती पूर्णपणे विसरून जाते.

अशा मुली सासरी जाताना रडतात. याचे कारण कदाचित एक परिचित सासर सोडून अपरिचित सासरी आपण जाणार आहोत याची जाणीव हेच असावे.

कारण माहेरच्या व सासरच्या जीवनात तसा काहीं फरक पडत नाहीं. मध्यम स्थितीतील, गरीब कुटुंबातील मुलींना भय-कर खाष्ट सासूच्या हाताखाली वागणाऱ्या सुनेइतकेच काबाडकष्ट करावे लागतात. आणि तेंहि निमूटपणे ! मुलापेक्षा कितीतरी पटीने मुली जास्त राबतात आणि त्याच्यावर सासरी जाण्याची पूर्वतयारी या नांवा-वर भयकर जुलूम होत असतो. मुलगी सासरी नांदलेली ऐकावी; नाहीं-तर मेलेली ऐकावी असा आईबापाचा बाणा असतो.

सावित्री अशाच वातावरणात वाढलेली होती. तिच्या विवाहाचे घाटूं लागले. त्यावेळीं ती शांत मनाने घरात वावरत होती. कोणी पाहावयास येत असले की, तिची वेषभूषेची तयारी चालू होई. तीमुद्धां अत्यंत निर्विकारपणे. आई सगळं सांगावयाची—" हे नेस. तसा पदर घे. इतका खाली सोड. पेडाची वेणी घाल. इतके कुंकू लाव. तशी उभी रहा. अशी बैस. " आणि सावित्री त्या तालमीत चांगली तयार झाली होती.

पहावयास येणारे काय काय पाहतात हे तिला पाठ झाले होते, आणि येणाऱ्याविषयीच्या ज्या हकीकती तिच्या कानावर येत त्यावरून ती त्या माणसाच्या पाहण्याच्या समारंभाची तयारी करीत असे. कोणाला ' केसरी ' आवडे तर कोणाला ' ज्ञानप्रकाश ' आवडे. कोणी विविध-वृत्त वाचावयास सांगे आणि एखादा असा निघे की, तो महाभारत, किंवा ते वेळेवर न मिळाल्यास निदान बालभारत वाचावयास सांगे. मराठी ४।५ इयत्ता झाल्यानंतर सावित्रीचे हेच वाचन सुरू झाले. तिने असलीं पुस्तकें स्वतःच जमविली होती आणि एका दप्तरांत म्हणजे आपल्या लहानपणच्या जुन्या परकरात बांधून ठेविली होतीं. एक दिवस तिच्या भावाने त्या दप्तरास हात लावल्या-बरोबर त्याच्या अंगावर ती खसकन् ओरडली. " माझ्या दप्तराला हात लावू नकोस ! "

" तुझें दप्तर ? "

" हो हो. ते माझेच दप्तर आहे. "

" अग, तू तर शाळा सोडलीस ना ? ह्यः ! ह्य. ! "

" मग दात काढायला काय झालं त्यात ? माझं लग्न व्हायचं आहे म्हणून मला बाबांनी शाळा सोडायला सांगितली. मला काही जन्मभर तुझ्यासारखं शिकत रहावयाचं नाहीं. "

" मग शाळा सोडल्यावर दप्तर कशाला हो बाइसाहेब ?"

" त्यांत मी ती वर्तमानपत्रे नि पुस्तकें जपून ठेविलीं आहेत. "

" तीं म्हणजे ? कोणचीं ? "

" चावटपणा करू नकोस. तुला माहीत नाही जस काही. मला मग वेळेवर वाटेल ते वाचावयास लावतात. परवा मी ती जटायूची गोष्ट चागली वाचून ठेवली होती आणि माझ पुस्तक कुठ वेळेवर सापडल नाही. आणि मग तो मनोरजनचा अक वाचतांना मी अड-खळले आणि आईनें मला मार दिला. तुला काय लागतय बाबा ! तेव्हापासून मी आपला माझा वाचावयाचा धडा वाचूनच ठेवते. कोणी तरी मेले येऊन काही तरी विचारतात. त्यापेक्षा आपल घडाघड वाचाव हे बर ! "

लग्नाच्या पूर्वपरीक्षेची सावित्रीला इतकी सवय झाली होती. तिच्या मनाचा अगदीं लहानसा भाग फक्त तिच्या जीवितात बाहेर भटकत होता, आणि त्या मनाला फक्त जगातल्या काही ढोबळ गोष्टी कळत होत्या. त्यात बारिकसारिक कोपरे अद्याप त्या मनाला दिसतच नव्हते.

तिच्या भोवताली तिच्या मैत्रिणी होत्या. त्यात काहीं शिकलेल्याही झाल्या होत्या आणि त्याचीं बोलणी ऐकताना सावित्रीला काही कळ-तच नसे. कारण तिला काय कळावे आणि काय कळू नये हें तिच्या आईबापानी तिला ठरवून दिल होते. तिला ते कोष्टक अगदीं पाठ झाले होत. केसाची अमकी रचना चागली आणि तमकी रचना वाईट असे तिला शिकविण्यात आले होत. चागली माणसें आणि वाईट माणसे याची तिच्या मनातली कल्पना मोठी मजेदार होती. शेपटा सोडणाऱ्या मुली अगदीं वाईट, आबाडा घालणाऱ्या आणि वर गजरा घालणाऱ्या मध्यम, पण नुसता आंबाडा घालणाऱ्या पण फुगे न काढ-णाऱ्या चागल्या ! ब्लाउझ घालणाऱ्या अगदी वाईट, पोलके घालणाऱ्या बऱ्या. चित्राची पुस्तके साधारणतः वाईटच. त्यातल्या त्यात मुख-पृष्ठावर एकट्या स्त्रीचाच फोटो असलेली अगदी टाकाऊ. परतु जर त्याच चित्राखालीं अशोकवनांतील सीता असे लिहिलेले असले, तर मात्र ते चित्र चागले. ते पुस्तकहि चागले. मग गीता बिनबाह्याची बॉडी

घातलेली, अत्यंत तलम पातळ नेसलेली, केसाचे फुगे काढून वेणी घातलेली, अगदीं मिस् सीता अशी असली तरी सावित्रीला, ते चित्र चांगलें असतें असे पटविण्यांत आलें होते. तें तिचें पाठ झाले होते. ते ती घडाघड सांगत असे. रस्त्यात कोणी तरुण स्त्रीपुरुष फिरताना पाहिलें कीं, ते बहिणभाऊ आहेत हे ती ताडकन् सांगे. खोलींत स्त्रीचा एकटा फोटो असला की, तो त्या खोलीत रांहणाऱ्याच्या आईचा आणि पुरुषाचा असल्यास वडिलाचा असतो असा तिचा ठोकताळा होता!

जीविताचे प्रश्न तोंडच्या हिशेबातील ठोकताळ्याप्रमाणे सोडविणारी सावित्री—नतर सत्यवानाची पत्नी झाली ! त्या नव्या जीवनात ती काही दिवस गांगरली आणि नतर त्यातहि तिच्या जीवनाला यात्रिकपणा आला.

सत्यवानास ती सत्यवान् म्हणून ओळखत नव्हती. पति म्हणून ओळखत होती. आणि सत्यवानाच्या आईला ती सासू म्हणून ओळखत होती. आपण आपल्या आईच्या आग्रहाखातर लग्न केले असें सत्यवान् लोकास सागत असे परतु वास्तविक त्यानें स्वतःच लग्न करावयाचें असे ठरविले होते. त्याच्या ध्येयाचे किवा हौशीचे सर्व मनोरे ढासळल्यावर आता लग्न तरी उरकून टाकू या, अशा वृत्तीने त्याने लग्न करण्याचें ठरविले. कित्येक दिवस त्याच्या मनांत अशी आशा होती कीं, कोणा तरी सुशिक्षित तरुणीशी आपला परिचय होईल. आपलें बौद्धिक वैभव तिला अभिनदनीय वाटेल. आणि शेवटीं त्या परिचयांतून सहवास, सहवासातून मैत्री आणि मैत्रींतून विवाह असा प्रवास करतां येईल.

सुशिक्षित तरुणी आतां माणसाची लायकी फार चाणाक्षपणाने ओळखतात. त्यांना पदवी, अधिकार किंवा पैसा यांच्या बद्दल वेड नसतें. गरीब परतु गुणवान् आणि सुस्वभावी अशा तरूणांना सुशिक्षित तरूणींनीं पत्करल्याची त्याला कांहीं उदाहरणें माहीत होतीं आणि त्या जोडप्याकडे तो मोठ्या कौतुकाने पाहत राही. त्या तरूणीबद्दल त्याला विल-

क्षण आदर वाटे ! सुशिक्षित सुदर तरुणीचा सहवास यापेक्षां जगांत कोणतें मोठें सुख आहे असें त्याला वाटे. त्याच वेळीं अशा सुशिक्षित दंपतींच्या कांहीं भानगडीहि त्याच्या कानावर येत होत्या. परतु ते सगळे ऐकूनहि तो म्हणे, "त्यांचे नवरे गाढव आहेत. त्यांना ते सुख, तो लाभ सांभाळण्याची अक्कल नाहीं." थोडक्यांत म्हणजे सुशिक्षित स्त्रियांबद्दल त्याचे अतिशय चांगलें मत होते. आपल्याला एकाद्या सुशिक्षित तरुणीने स्वीकारले तर आपण तिला आपली लायकी खात्रीनें पटवू. जगाला आपण दाखवू, सुशिक्षित पति-पत्नी किती सुखाने जगूं शकतात ! आम्ही सुशिक्षित पैशाची पर्वा करीत नाहीं. इतर ससारी लोकाच्या कल्पनेपेक्षा आमची ससारसुखाची कल्पना किती उच्च-निराळी आणि अभिजात आहे. आपण ५०|६० रु. मिळविणार. पत्नि ५०|६० रु. मिळविणार. एका प्रोफेसरइतका पगार घरांत येऊ लागेल. एक-दोन-तीन खोल्याचा ब्लॉक ! ते बरोबर जाणे, बरोबर येणें, बौद्धिक का काय म्हणतात तो सहवास ! त्या चर्चा, ती विचारांची देवघेव, ते व्यक्तिस्वातत्र्य आणि त्या व्यक्तिस्वातत्र्याला धक्का न लावता केलेली मैत्री—वगैरे वगैरे—

परतु त्याचें वरील 'टेंडर' जीविताच्या स्थानिकस्वराज्यात स्वीकारलें गेले नाहीं ! त्याच्याशीं जीविताच्या योजनेविषयीं वाटाघाट करण्यासाठीं तर राहोच; परतु नुसती बातचीत करावयाससुद्धां कोणतीहि सुशिक्षित तरुणी आली नाहीं. तो कॉलेजच्या जीवनाची सगळी वाट चालून गेला. तरी त्याला कोणी प्रवासी भेटलाच नाही आणि सगळे प्रवासी आपापल्या गाडीने निघून गेल्यावर तो आपल्या मनोराज्याच्या जक्शनवरून पाय वाटेने व्यवहाराच्या खेडेगावीं निघन् आला.

त्याच्या आईला सत्यवानापलीकडचें जगच माहीत नव्हते. त्याच्या वडिलांच्यामागे आपली जबाबदारी म्हणजे सत्यवानाचे दोनाचे चार हात करुन देणे एवढीच, अशी तिची कल्पना होती. सत्यवानावर तिचें अतिशय प्रेम ! इतके कीं, सत्यवानाचे 'नवे' मन तिच्या मायेच्या

गोधडीखालीं गुदमरूं लागे, कांहीं कोठे इकडेतिकडे केले किंवा झालें कीं, सत्यवानाची आई धावत येऊन सत्यवानाभोवतीं आपल्या मायेचा विळखा घाली. आईला दुखवणे त्याला शक्यच झाले नाहीं. त्यामुळें वडिलांच्या मागें तो आईच्या जाळ्यात सांपडत गेला. त्याच्या वैयक्तिक जीवनाचे पंख तुटलेच होते ! तेव्हा तो मग मातृसेवेच्या पिंजऱ्यांत पडून राहिला आणि याच परिस्थितींत आईच्या आग्रहावरून त्याने सावित्रीचा स्वीकार केला. सावित्रीशी विवाह करण्यास समति देताना सहधार्मिणी, सहचारिणी, वगैरे कल्पनाचा मोसम ओसरला होता. त्याने फक्त एक बायको—स्त्री एवढ्याच कारणासाठी सावित्री पत्करली ! आपल्या माहेरच्या परिस्थितीच्या मानाने आपण एका बी. ए. ची बायको झालो हे पुष्कळ झाले असे सावित्रीला वाटे. तिला असेंहि वाटू लागले कीं, आपली निवड झाली. पत्करलेल्यापैकीं आपण नाही. बी. ए. माणसाने आपणांस ‘ पास ’ केले यात ती सतुष्ट होती.

सत्यवान् आपली नोकरी व तत्संबधीं मित्रमंडळी यांत सगळा वेळ घालवीत असे. घरीं आल्यावर तो नेहमी दमलेला दिसावयाचा. आईला वाटे ‘मुलाला किती श्रम पडतात’ आणि मग सावित्रीलाहि वाटे खरच ते किती दमतात ! परतु सत्यवान् दमत नव्हता, कटाळला होता. त्याला घराबद्दल ओढच वाटत नव्हती. रजिस्ट्रार ऑफिसमध्ये नोकरी असल्याने वैवाहिक व्यवहारांतील अगदी अस्सल सुधारणेच्या हालचाली त्याला कळत. विवाहोत्सुक, स्वतत्र असे प्रेमी लोक तिथे येत आणि त्याच्या कागदावर साक्षी घालतां घालतां सत्यवान् आपल्या जीवनाविषयीं विषाद वाळगू लागला. त्याच्या मेंदूत त्या विचारांनीं एक विकृतीच उत्पन्न झाली होती. “बायको फॅशनेबल पाहिजे” हाच त्या विकृतीचा साधा अर्थ होता. सेवा वगैरेची त्याला चवच नव्हती. त्याच्या शरीराला कष्टाची चांगली सवय होती. तेव्हां सावित्रीच्या सेवेची त्याला फारशी अभिरुची नव्हती. सावित्रीनें फॅशनेबल पद्धतीनें राहिलें पाहिजे, असे त्याला सारखें वाटत राही. सुधारणेच्या जगांतील भडक-

पणाचा त्याच्या मनावर भयकर पगडा बसला होता. सावित्रीला त्या पायरीवर आणण्यासाठीं काय करता येईल याचा तो सारखा विचार करी. आपले वैवाहिक जीवन आधुनिक कसे दिसेल ही सारखी त्याची हुरहुर आणि ते जुनाट किंवा मद होत जाऊ नयेत यासाठीं तो सारखी चरफड करी.

परतु सावित्रीला आपल्या पतिदेवाच्या या आतल्या आवाजाचा पत्ताच नव्हता. तिला वाटे, "हे आपली कसोटी पाहत आहेत. प्रेम वाटते पण व्यक्त करीत नाहींत. एकदम प्रेम दाखवून बायका डोक्या-वर बसतात, अशा कल्पनेनें ते आपल्याशी मुद्दाम तोऱ्यात वागत आहेत. आपणास एवढ्या मोठ्या माणसाचे प्रेम मिळवावयाचे म्हणजे तपश्चर्यांच केली पाहिजे." आणि तिची अहोरात्र तपश्चर्या चालली होती. सत्यवान् व सत्यवानाच्या घरातील प्रत्येक व्यक्ति व वस्तु याची ती सेवा करीतच होती. काहीही करताना तिच्या मनात एकच विचार असे कीं, ही सेवा सत्यवानाला कळेल व तो सतुष्ट होईल.

पहाटेस ती उठे. ते सत्यवानास आवडत असेल याच अपेक्षेनें. तोंड स्वच्छ धुतानासुद्धा ते सत्यवानास आवडावे हा विचार. नतर देवाला नमस्कार, सासूबाईंना नव्हे, सत्यवानाच्या आईस नमस्कार करणे, मग सत्यवानाच्या घरातल्या देवघरातल्या देवाना नमस्कार करणे, त्याच्या गोठ्यातल्या गाईंचे पुच्छ डोळ्याला लावून नमस्कार करणे, त्याच्या घराचे अगण झाडणे—सारवणे या कामापासून तों दुपारी जेवण झाल्यावर सत्यवानाच्या आईचे पाय चेपणे व शेवटीं झोपण्यापूर्वीं सत्यवानाचे पाय चेपणे आणि सत्यवानाची बायको म्हणून झोपणे—इतके तिचे जीवन सत्यवानमय झाले होते.

डॉ. वसिष्ट-अरुधती याच्या विवाहपत्रकावर साक्ष घालून सत्यवान घरीं आला त्यादिवशी सध्याकाळच्या वेळीं सावित्रीचीं अशीच 'सत्य-वान्सेवा' प्रकरणातील कांहीं कामे चालली होती. गाई घरी येत होत्या आणि त्यांच्या मागोमाग गुराखी व सत्यवानासारखे कष्टाळु

जीवहि घरीं येत होते. गाई व सावित्री सारख्या स्त्रिया याच्यांत किती तरी साम्य होतें ! गाई रानांत जातात, सावित्री जात नसे; फक्त-एवढाच फरक ! सध्याकाळीं गाई वासरांना भेटण्यासाठीं अधीर होतात. सावित्री सत्यवानाची तितक्याच तळमळीने वाट पाहत असे. सध्याकाळ झाली कीं, तिची कळी खुलू लागे. ती कांहीं तरी गाणें गुणगुणू लागे. तुळशीपुढे, गोठ्यांत, ओटीवर पणत्या लावताना ती तुरुतुरु चालू लागे आणि येतां जाता 'आले वाटत, अजून नाही आले ! आले कीं काय ?' असे उद्गार स्वतःशीच पुटपुटे.

त्या दिवशीं सत्यवान् घरी आला. त्यावेळी ती गोठयांत गाईना चारा घालीत होती. त्यामुळे तिला तें कळले नाही. आज का बर उशीर झाला?" या विचाराने तिचा जीव व्याकूळ झाला होता.

गोठयांतलें काम आटोपून ती माडीवर गेली. आणि खोलींत दिवा-बत्ती करण्यासाठी तिकडे गेली.

सत्यवान् येऊन अर्धवट अधारांतच अथरुणावर पडला होता. सावित्रीस हें माहीत नव्हते. त्याला इतका उशीर झाल्याबद्दल ती :रड-कुंडीस आली होती आणि सत्यवानाचा खोलीतला फोटो पाहिल्यावर तर तिला भडभडूनच आले. ती एकदम तेथे उभी राहिली आणि फोटोंतल्या पायावर हात ठेऊन स्फुदत स्फुदत म्हणू लागली—

"किती उशीर केलांत आज ? मी किती तळमळते तुमच्या दर्शना-साठीं ! मीं आवडते-ना तुम्हांला ? माझ्याकडून चुकत कां कांहीं ? माझी सेवा कमी पडते का ? सांगाना मला. सांगाल ते करीन."

"आधीं बाहेर जा" त्या खोलीतल्या कोपऱ्यांतून आवाज झाला.

सावित्रीला दरदरून घाम सुटला. तिने वळून पाहिले. तों सत्यवान्!

ती एकदम हंसू लागली. आणि डोळ्यांत जमलेलें पाणी गालावर ओघळावयाच्या आंत नाहींसें झालें.

"इश्श ! केव्हां आलांत ? आणि अंधारांत बसून राहिलांत ? मला हांक सुद्धां मारली नाहीं. अं !"

"सांगेन तें करणार आहेस ना ?"

'अस आडून ऐकू नये बर का ? चोरून ऐकणं म्हणतात याला!"
सावित्रीचे प्रेमळ हृदय शब्दांतून ओसंडत होते.

" माझ्याच फोटोसमोर—मलाच उद्देशून म्हणालीस ना तें ?"
सत्यवानाच्या आवाजांतला कठोरपणा तिला आता कळला. तिच्या
काळजाचे पाणी झाले.

" हो—! कबूल आहे मला. सांगाल ते ऐकेन. सांगा ना."

" सांगितले ना—बाहेर जा आधी."

" अस्स काय करता ? माझ्या हातून अपराध झाला का ?"

" झाला नसला तरी आता होतो आहे ?"

" नाहीं. मीं नाही जाणार. तुमचे डोके दुखतं आहे ना ? मग
मी बाहेर कशी जाऊ ? माझे पाय हालतील का ?"

" बर एक काम कर."

" काय ? सांगा ना मी ऐकायलाच तर उभी आहे !"

" मग तो दाराला लावायचा धोंडा आण पाहू जरा इकडे !"
सावित्रीला या आज्ञेचा अर्थ कळेना. ती गोंधळून उभी राहिली.

" ऐकतेस ना ? ऐकू येत नाहीं ?"

सावित्रीने तो दगड आणला.

" हं तुझ्याच हातात राहू दे आणि या येथे मार !"

सावित्रीच्या हातांतून तो धोंडा खाली पडला. तिच्याच पायावर
पडला. तिच्या डोळ्यांतून घळघळ पाणी वाहू लागले. तिने हातानें
तोंड झाकून घेतले.

" अस काय करता ? तुम्हाला मी आवडत नाही का ?"

" कोण म्हणतो ? फार आवडतेस ! वा ! किती प्रेम आहे माझे
तुझ्यावर !"

" हें अस वाटतं ? धड बोलतसुद्धां नाहीं. बर नका बोलू. मला

बसू तर घ्याल नुसती ? तुमचें एखादें पुस्तक देतें. तुम्ही वाचीत बसा मी ऐकते ! नाहीतर मी वाचून दाखवते ! मला नेहमी वाटतं तुम्ही दमून भागून आलात कीं, असं विश्रांति घेत पडाव नि मी इथें बसून तुम्हाला कांही काही वाचुन दाखवाव.

" काय वाचून दाखवाव ? तुळसीमाहात्म्य ? कीं व्यंकटेशस्तोत्र ? "

" तुम्हाला आवडेल ते. तुम्ही सागाल ते ! "

" काय कळत तुला त्यातल ? मला काय आवडत हे कळण्या-इतकी तुला अक्कल आहे अस वाटत तुला ? "

" कधी पाहिलत तुम्ही नाही हे ? "

" तुला बाहेरच्या जगाची, आमच्या जगाची-माझ्या जगाची काहीं तरी माहिती आहे ? म्हणे मी वाचून दाखवते. नाहीं तर तुम्ही वाचून दाखवा. काय कळणार आहे तुला यातल ? छापलेला कागद नि कोरा कागद तुला सारखाच. मासिकातले विषय नि वर्तमानपत्रातल विषय तुझ्या कानावरूनसुद्धा गेले नसतील. जगात काय चालल आहे ठाऊक आहे तुला ? आता तुझ्यासारख्या मोलकरणी जगात राहिल्या नाहीत. बायका शिकल्या आहेत. घडाघड बोलतात, धडाधड लिहितात. तडातड कामे करतात. पैसे मिळवतात. स्वतः नवरा निवडतात. त्याला बरोबर घेऊन लग्न लावतात. किती सुदर राहतात, नि बोलतात ? तू कधीं त्या जगात गेलीस, कधीं काही पाहिलेस, का ऐकलेस ? तुला व्याख्यानाला न्यावस वाटल तर तुला काय कळणार आहे आमच्या आधुनिक जीवनांतल्या प्रश्नातल ?"

" पण तुम्ही शिकवल तर नाहीं का कळणार ? "

" मी ? मग माहेरीं काय केलस ? लग्नाच्यापूर्वी काय केलस ?

" तेव्हा शिकायच तेवढ शिकले. आतां मी नाहीं म्हणते कां शिकायला ? "

" मी तुझा नवरा आहे, कीं मास्तर ?

"लिहिणवाचण शिकविण्यासाठीं कोणी बाई पाहिजे होती. म्हणून तुला आणली कां मी घरांत? मग त्यासाठीं लग्न करावयाची जरूर काय होती? तुझ्या घरींच शिकवणीचा मास्तर म्हणून आलो असतो अन् १०।१५ रुपये मिळाले तरी असते. आता मलाच खर्चावे लागतात."

सावित्रीला हा उपमर्द थोडासा परिचयाचा होता, तरी त्या दिवशीं तो सहन झाला नाहीं. सत्यवान् तिला नेहमीं दूरदूर ठेवीत असे. परतु तिच्या उणेपणावर इतके तीव्र घाव त्याने कधी घातले नाहीत.

त्या दिवशीं त्याचे डोकेच भडकले होते. अरुधतीस पाहिल्यापासून त्याला आपल्या विवाहपूर्व जीवनाची तळमळून आठवण झाली; आणि जे पाहिजे होते,जे मिळणे शक्य होतें, इतराना शक्य झाले जे निदान तसले काहीं मिळाले नाही याबद्दल त्याला स्वतःच्या जीवनाचा मनस्वी सताप आला आणि त्याचा वचपा तो सावित्रीवर काढू लागला.

सावित्रीला रडू आवरेना !

सत्यवान् जास्तच चिडला. त्याचा आवाज चढू लागला आणि सावित्रीचे रडे वाढू लागलें.

सत्यवान् आल्याचे आईने पाहिले होते. सावित्री वर गेल्याचेंहि तिने पाहिले होते. परतु कांहीं वेळाने रडण्याचा नि ओरडण्याचा आवाज ऐकल्यावर ती म्हातारी खालूनच ओरडली—

" सावित्री ! ए सावित्री ! "

सावित्री उठून खालीं जाऊं लागली.

सत्यवान् खेकसून म्हणाला—" मेल्याखेरीज पुन्हा तोड दाखवू नकोस. "

आई वर आली. तिला हें परिचयाचेंच होते. परतु भांड्याला भांडें लागावयाचेंच, या न्यायाने तिला कांही विशेष वाटत नसे. तिच्या वैवाहिक जीवनावरून तिनें असा सिद्धांत बाधला होता कां,

यांत विशेष कांहीं नाहीं. याच अनुभवसिद्ध वेदांताची ' घुटी ' पाजण्यासाठीं ती वर आपल्या मुलाकडे गेली.

सत्यवान् अथरुणावर पडला होता.

"काय झाल रे बाळ ? डोक दुखतय का?"

"कां ऽ हीं झाल नाही. व्हायच ते सगळ होऊन चुकल आहे. "

"काय होऊन चुकल ? "

" तुझ्या मुलाच लग्न ! दुसर काय?"

"अस काय कराव सत्यवान्! पोरीच्या जातीला थोड सभाळून घेतलं पाहिजे. शिकवल की सगळ येत. काय कमी झाल आहे तुझ लग्नामुळ?"

"आयुष्य! तुझ्यासाठी ही धडपड केली. तुला सून मिळाली. मला बायको मिळावयाची आहे."

"काय बोलतोस हे ?"

"खर आहे तेच. ही काय बायको आहे? चार मित्र मडळींत हिला बायको म्हणून घेऊन गेलो तर लोक हसतील मला !"—

"पण पुरुष मडळीत बायका नेतांच कशाला तुम्ही ? आणि त्या येतात तरी कशा, नि कशाला ? "

"आईसाहेब ! नमस्कार करतो तुम्हाला ! पण तुमच्यांत व तुमच्या मुलांत २५ वर्षाच अतर आहे, एवढ तरी लक्ष्यांत घ्या. दिवस बदललेत आतां. "

" मग माणसेहि बदलून घ्या कीं ! तिला शिकव. बरोबर आणलं नेलं म्हणजे सगळ कांहीं येईल. "

"खर आहे. २५ वर्षे स्वतःला शिकविण्यांत गेलीं. आतां राहिलेली बायकोला शिकविण्यांत घालवतों. तू माझ्या लग्नासाठीं छळ केला नसतास तर किती शिकलो असतों ! किती पगार मिळविला असता ! किती हुशार बायको मिळाली असती ! हा काय ससार आहे कीं, गांवठी शाळा आहे ? "

" आता तुम्हाला ती गावठी शाळा वाटू लागली आहे. मला आपल एवढ समजत कीं, तुम्ही ज्याला गावठी शाळा म्हणून नाकानें कांदे सोलू लागलात त्याच घरात आमचे ससार झालेत. काय आमच कमी झाल ? तुमच तरी काय कमी झाल ? घरातल मोठेपण माणसाच्या विद्वत्तेपेक्षा माणुसकीवर असत ! मला तर सूनबाईइतकसुद्धां लिहितावाचता येत नव्हत. दुधवाल्याचा हिशेब मी दारामागच्या भितीवर गधाच्या ठिपक्यानीं लिहीत होते. तुझेहि वडील काही कमी शिकलेले नव्हते. पण माझा कधी त्यानी पाणउतारा केला नाही. त्याच्याहि लिहिण्यावाचण्याबद्दल मी कधी जळफळले नाही. घरात घरची माणस आली कीं, फुलावर कोवळे सूर्यकिरण पडल्यासारख झाल पाहिजे. आम्हीहि आगणात ओटीवर गप्पागोष्टी करीत बसत होतों. पण त्यात घरच्याच गोड गोष्टी असत. तुम्ही घरी आलात तरी जग विसरू शकत नाही. घर ही विसाव्याची जागा आहे बाबा. घर म्हणजे काही शकराचार्यांचा मठ नाही ? बर. तुम्हाला तुमच्या बायकांना बरोबरीला आणावयाचे आहे ना ? मग आणा कीं !"

" आधुनिक ससाराची कल्पना येणार नाही आई तुला. स्वयपाक म्हणजे ससार नाही. चूल म्हणजे ससार नाही. धुणे नि पाणी भरण, आघोळीच पाणी उपसण नि पाटावर धोतराच्या निऱ्या करून ठेवण, निराजन लावणे आणि वाती वळणे, हे ससार सपले आतां. आज आमच्या पिढीच्या आकाक्षा वाढल्या आहेत आई ! आम्हांला सहचारिणी नकोत. सहविचारिणी पाहिजेत. शरीरसबधाचे दिवस सपले आतां. आतां हृदयाचे अनुबध पाहिजेत. असो. काय सांगून उपयोग? समजा तुला कळल तरी काय उपयोग त्याचा, दिवस काढायचेत आम्हांला. तुमच स्टेशन पुढें दिसू लागलं आहे. पण आमची गाडी नुकतीच स्टेशन सोडून बाहेर पडली आहे ! आणि तोच ही रडारड ! जातों मी. जाऊं दे. तूं कशाला त्रास करून घेतेस उगाच ! "

" सत्यवान्, कुठें चाललास ? "

" जेवायला. "

" घराबाहेर ? "

" हो कायमचा नाहीं. जेवणापुरता "

" इतक्यांत सावित्रीनें जिन्यातून सांगितले. जेवायच झाल्य "

सत्यवानानें वरूनच उत्तर दिले. " मग जेऊन घ्या. उगाच कां बं उशीर करतां ! "

आईला हा उपहास सहन झाला नाही. ती सतापून म्हणाली, " बघ ! तू इतका उपमर्द केलास पण ती आपल्या कर्तव्याला चुकली नाही. तशी बायको तुला मिळाली असती म्हणजे मग समजल असतं सुख ! तुम्हाला वाटत आम्हाला भोवतालच कांहीं दिसत नाही. सगळी थेरे पाहिलींत मी ! नवराबायकोचे म्हणे मतभेद होतात. आणि बायको सैपाक करीत नाहीं आणि नवरा निषेध म्हणून उपाशी राहतो. मग जेवतात केव्हा आणि का कोणास ठाऊक ? "

" आहे खर. माझ्या लग्नान जेवण्याची निश्चित सोय झाली आहे खास. तुझ्या सुनेचा मी आभारी आहे त्याबद्दल ! "

" मला कांहीं सांगू नकोस. जेवायला चल मुकाट्याने ! "

" अग मला जेवायला जायच आहे. "

" खाणावळींत ?

" वा: ! आज एक लग्नाची फीस्ट आहे. "

" मग मूळचिठ्ठी नाहीं आली ती ? आणि रात्रीं जेवण. लग्नाच जेवण आहे कीं, सत्यनारायणाच उद्यापन आहे ! बर, जा बाबा. पण रागावून बाहेर जेवलास तर पहा ह. मी पाणी घ्यायची नाहीं या घरांत "

" नाहीं आई. तुझी शपथ नाहीं. मी बायकोचा राग आईवर काढण्याइतका अगदीं 'हा' नाहीं. "

" आणि बायकोवर तरी काय झाल्य रागवायला ! "

" नाहीं—काऽहीं नाहीं ! कोण म्हणतो रागावलो म्हणून ? छट्

मुळींच नाही. माझी बायको म्हणून नसले तरी तुझी सून म्हणून मानायला पाहिजे ना तिला !

" पुरे झाल. जा. लवकर ये जेऊन. रात्रीच उगाच जड खाऊ नकोस. जरा दोन घास कमीच ! आणि तिला उगाच छळीत जाऊ नकोस. मी अन्नपाणी वर्ज्य करीन अशान पहा. मला साग काय पाहिजे ते. मी तिला शिकवीन तशी."

" ठीक आहे."

सत्यवान् कोट टोपी घालून बाहेर पडला. दाराशींच त्याला सावित्री दिसली. त्याला पाहिल्याबरोबर तिने हसतमुख केले ! सत्यवान् सर्दच झाला. त्याला आपल्या वर्तनाची लाज वाटली. सावित्रीच्या हसण्या-मध्ये अत्यत केविलवाणेपणा दिसत होता. आपण हसलेच पाहिजे, नाही तर रडावे लागेल. अशा भीतीची स्पष्ट जाणीव तिच्या मुद्रेवर दिसत होती. सत्यवानाला आपल्या पुरुषी अरेरावीबद्दल तिरस्कार वाटू लागला.

आणि ती अरेरावी तिरस्करणीयच नव्हती का ? सावित्रीला त्याने पत्करली नसती तर ती दुसऱ्या सत्यवानाची सेवा करीत राहिली असती. किंबहुना हा तिच्या वडिलाचा प्रश्न होता. यात अपराधी कोणी असतील तर सावित्रीला 'देणारे' वडील. आणि तिला पत्करणारा सत्यवान् किंवा त्याची आई किंवा दोघेही! सावित्री या व्यवहारात अगदीं मोकळी होती. तिचा शब्द किंवा विचारहि याबाबतीत बांधलेला नव्हता. कारण तिला कोणी विचारलाच नव्हता. सावित्रीला केव्हांही म्हणता आले असते की, मी कांहीं तुमच्या गळ्यात पडले नव्हते. तुम्ही नकार द्यावयास मोकळे होता पण आता निवड करण्यांत कांहीं चूक झाली असं मागाहून कळून काय उपयोग आणि त्याचा सूड माझ्यावर काय म्हणून ? "

परंतु सावित्री असे कधीं म्हणणें शक्य नव्हतें म्हणून तर सत्यवान् तिचा येतांजातां पाणउतारा करून आपल्या ध्येयाच्या आशाभग्न मनाचें

समाधान करून घेत असे. परतु त्या दिवशी सावित्रीचे ते दीनवाणें हास्य पाहून त्याचें हृदय पाझरले.

" किती असाहाय्य आहे ही ! आपल्यावर हिचे सर्व जीवन अवलबून आहे. हिचे हसणे वा रडणे हे सुद्धा स्वाधीन नाही. आणि हें कशासाठी—? पोटासाठीं ? विवाह हा हिंदु स्त्रीचा पोटाचा व्यवसाय आहे आणि शिवाय तो सक्तीचा आहे. वेळेवर पोटाला मिळाले नाही तरी चालेल. परंतु हा व्यवसाय सोडता कामा नये. काय हिला आपल्याबद्दल प्रेम वाटणार ? मोलकरणीइतकेहि स्वातत्र्य नाहीं हिला. ज्या दोषाबद्दल आपण हिला नेहमीं बोलतो तो हिचा दोष आहे का ?

इत्यादि विचार करीत सत्यवान् घराबाहेर पडला. तो जाताना पाहूनहि हसला नाही याचे सावित्रीला इतके वाईट वाटले की, सत्यवान् बाहेर पडल्याबरोबर ती मटकन् खाली बसून घळघळा रडू लागली.

---

# एक बाळ म्हातारा



## प्रकरण ३ रें.

नव्याने उगवत्या नि उमलत्या फुलझाडाच्या मुळाला एकदम कीड लागून ज्याचा विकास थांबावा तशी डॉ. वसिष्ठाच्या मनाची स्थिति होती. लहानपणाच त्याच्या मनाच्या काही ग्रंथींची गाठोडी झाली होती. अतिशय श्रीमंताच्या कुळात जन्म झाल्यामुळे त्याचा लहानपणचा बराचसा काल आपल्या भावतालची अफाट श्रीमंती पाहण्यातच गेला. आपल्या दिवाणखान्यात सगळीकडे गालिचे पहात राहिल्याने जमीन म्हणजे गालिचे अशी त्याची कल्पना झाली होती. आणि घर म्हणजे बंगला अशी त्या कल्पनेच्या शेजारी दुसरी कल्पना होती. वडिलांचे ते एकुलते एक चिरंजीव होते. त्यामुळे त्यांना लहानपणीसुद्धा मोठ्या माणसांचाच सहवास मिळाला होता. त्यांचे खेळगडी म्हणजे आई आणि बाप आणि आईबापांनी परवानगी दिल्यास गडी किंवा मोलकरीण! 'रोगांत' शास्त्रावर डॉ. वसिष्ठाच्या वडिलांचा विलक्षण विश्वास होता. त्यामुळे आपल्या मुलाच्या भोंवती कोणच्या वस्तु आणि व्यक्ति असाव्यात याची ते फार चिकित्सकपणे दक्षता बाळगीत. बालमानसशास्त्रांतील कित्येक अपरिपक्व सिद्धांतांचे प्रयोग करण्याची प्रयोग शाळा म्हणजे बाल-वसिष्ठाचे जीवन!

गौतमबुद्धाच्या चरित्रात एक प्रसंग सांगितला आहे. गौतमाच्या जन्मानंतर शुद्धोदन राजाला एका प्रसिद्ध ज्योतिषाने भविष्य सांगितले होते कीं, हा आदर्श राजा किंवा आदर्श योगी होईल. एक दिवस हा राजसंन्यास घेईल. ते भविष्य ऐकल्याबरोबर शुद्धोदनास अतिशय वाईट वाटलें. आपल्या मुलाला वैराग्याची 'फीट' येऊ नये यासाठीं त्याला दुःखाची पुसटसुद्धा सूचना मिळू नये असें वातावरण त्याच्याभोंवतीं उत्पन्न करण्याचें त्यानें ठरविलें. वृद्धत्व, रोग इत्यादि दृश्ये त्याला

कोणच्याहि स्वरूपांत दिसणार नाहींत अशी खबरदारी घेण्याबद्दल नोकरांना फर्मावण्यात आले.

गौतम ज्या बागत फिरावयास जाई त्यांतील झाडावरचीं पिवळी, जुनी पाने आधी तोडून टाकण्यात येत. आणि गौतमास फक्त हिरवीगार टवटवीत पाने, पिकलेलीं फळे एवढेच दिसावे इतकी व्यवस्था करण्यात आली होती ! परतु शेवटी झाले काय, या लपविलेल्या जगाचे त्यास एकदम दर्शन झाले. आणि त्यामुळे तो दचकून अरण्यात पळाला !

डॉ. वसिष्ट यांचे जवळ जवळ असेच झाले होते. ते फक्त अरण्यात पळाले नाहींत. तर आरण्यकादि वाङ्मयात दडाले. जीवनातील अत्यत रुक्ष भागाशीच त्यांची दोस्ती जडली. मायापाशाचा ओझरताहि परिचय न होतां त्याना 'ब्रम्हा' ची गोडी लागली. न वापरलेल्या वस्तु ज्याप्रमाणे पडून पडून उपयोग न केल्यामुळे निरुपयोगी होतात, गजून जातात, तसें त्यांच्या मनाच्या बऱ्याच भागाचे झाले होतें. काही हटयोगी आपला उजवा हात सारखा उभाच ठेवून तो शेवटीं वाळवून टाकतात. तसें डॉ. वसिष्टांचे मन झालें होते. स्त्रीप्रेमाची ओळख त्याना वेदात-विषयक ग्रंथांतून झाली होती तेवढीच ! ईश्वराला बनवून या जगाचा बोजा त्याच्या डोक्यावर लादणारी जी स्त्री तिचे नाव माया ही त्याची व स्त्रीची पहिली ओळख. माणूस तसा मोठा हुशार परतु त्याच्या हुशा-रीला बुद्धीचे एवढे मोठे टेगूळ आले होतें. त्यामुळे त्याच्या वागणुकींत एकप्रकारचा सौम्य वेडसरपणा आला होता.

ग्रथाचे त्याला अतिशय वेड ! लहानपणीं त्याला विद्वान करण्याच्या त्याच्या बापाच्या अट्टाहासामुळे त्याला ग्रथांचे व्यसन लागले होते. माणसांत तो बुजत असे. त्यामुळे पुढे पुढे त्याला माणसांत वावरण्याचें प्रसग आले त्यावेळीं माणसाची सवय नसल्यानें तो बावळट ठरे. त्याचे सोबती त्याची थट्टा करीत. आणि त्यामुळें तो चार माणसांत बसण्याचें टाळूं लागला. मित्रामुळें मुले बिघडतात, हा त्याच्या वडिलांचा सिद्धांत असल्यामुळें आपल्या चिरजीवासाठीं योग्य

मित्र शोधण्याची वडील धडपड करीत होते. त्या संशोधनाच्या कसोटी-
ला वसिष्टाचा एकही समवयस्क टिकला नाही व शेवटीं मैत्रीची भूक
वसिष्ट आपल्या वडिलांच्याच सहवासात भागवू लागला. वडिलांच्या
संगतीत चोवीस तास राहिल्याने त्याचे तरुण मन गंभीर झाले होते.
उमलता चेहरा थिजून गेला होता. कोवळे मन राठ झाले होतें!
लहान वयात प्रौढ माणसाचा पार्ट करावा लागल्याने आणि तो
वर्षांच्या वर्षे करावा लागल्याने वसिष्ट हा वयाने तरुण व मनाने म्हातारा
झाला होता.

मुलें बिघडण्याचे वय म्हणजे तारुण्य आणि कारण म्हणजे
स्त्रिया! याहि अर्धवट सिद्धांतावर वसिष्टाच्या वडिलाचा मोठा कटाक्ष
होता. मुंज झाल्यापासून वसिष्टाच्या वडिलानी वसिष्टाला आईच्या
फार वेळ सहवासात राहण्याची बंदी केली! पुढं त्याची आई
वारल्यानंतर तीहि भीति दूर झाली! शोपेनहार नावाच्या तत्वज्ञानास
पूर्वायुष्यात स्त्रीविषयक काही वाईट अनुभव आल्याने त्याचे एकंदर
स्त्री जातीबद्दल मनच कलुषित झाले होते. तसेच डॉ. वसिष्टाचे होतें.

या सगळ्या शिक्षणाचा परिणाम असा झाला कीं, वसिष्ट अभ्यास-
क्रमात अत्यंत हुशार ठरला. भराभर बक्षिसे व शिष्यवृत्त्या मिळविण्याचा
त्याने सपाटा चालविला आणि शेवटी त्याने माणसात न मिसळतां
आपल्याविषयीं एक कुतूहल भोवतालच्या माणसात उत्पन्न केले!

या कुतूहल वाटणाऱ्या व्यक्तीपैकीं अरुंधती ही एक होती. वसि-
ष्टाच्या एकलकोंडेपणामुळेच तिला त्याच्याविषयीं काही विशेष आकर्षण
वाटू लागले. कॉलेजातच ती दोघे बरोबर होतीं. अरुंधतीविषयीं
वसिष्टास काही माहीत नव्हते. अरुंधती दुरून दुरून वसिष्टाच्या जवळ
जाण्याचा मार्ग न्याहाळीत होती.

परंतु एरव्ही ज्या माणसाला भेटण्याचा योगच येत नाहीं
त्या माणसाला त्याच्या दुःखांत सहानुभूति दाखविण्याच्या
निमित्ताने गाठता येते. कारण दुःखिताचे सांत्वन करणे हा वाटेल

त्या माणसाचा जन्मसिद्ध हक्क आहे. वसिष्ट बी. ए. होऊन कॉलेजात फेलो म्हणून रहात होता त्यावेळी अरुंधती ज्युनिअर बी. ए. च्या वर्गात होती.

एक दिवस वसिष्ठाचे वडील वारल्याचे तिला कळले! प्रो. वसिष्ट ७।८ दिवसाची रजा घेऊन आपल्या गावी जाऊन आले. त्यांची ही पहिली गैरहजेरी! त्याच्या खोलीला कुलूप लागलेल पाहणे किंवा खोलीची दारे उघडी असणे ही विद्यार्थिवर्गात पैजेची गोष्ट होती. नेहमी दाराला आतून कडी घालून वसिष्ठाचे अध्ययन चालू असावयाचे! सुटीत मुद्धा हाच नियम! कॉलेजात तास घेण्यापुरते फक्त ते बाहेर येत. जेवणाचे ताटसुद्धां खोलीत यावयाचे! सर्व विद्यार्थ्यांना प्रो. वसिष्ट यांच्याबद्दल कमालीचा आदर वाटण्यास ज्या गोष्टी कारण होत्या त्यातील ही एक मुख्य होती. त्या खोलीवरून जाताना विद्यार्थि पाऊल न वाजविता जात, न जाणो कदाचित् मुनिवर्यांची समाधि भंग पावावयाची!

परंतु प्रो. वसिष्टांच्या खोलीला एक दिवस बराच वेळ कुलुप पाहिल्यावर सर्व विद्यार्थ्यांत तोच एक विषय झाला. दुपारीं कॉलेजात सर्वांना कळले कीं, त्यांचे वडील वारल्याची तार आल्यामुळे ते गावी गेले आहेत. वसिष्ठाना कोणी नातलग आहेत. याचेच विद्यार्थ्यांना आश्चर्य वाटले! परमेश्वराप्रमाणे हा माणूस स्वयंभू असावा अशीच बहुतेकांची कल्पना!

प्रो. वसिष्ठाच्या गैरहजेरीमुळे विद्यार्थिवर्गात फारच चर्चा माजली. सगळ्याना चुकल्याचुकल्यासारखे वाटू लागले. ते कधींहि कोणावर रागावत नसत. कोणाशी बोलतच नसत, तर रागावणे दूरच! कोणी नमस्कार केला कीं, तो मात्र हसतमुखाने स्वीकारीत.

कॉलेजांतले प्रोफेसरसुद्धा चार-चौघांसमक्ष मुलींशी बोलावयास संकोचतात. भोवतालच्या जगाच्या विकृत दृष्टिकोनाची त्यांना भीति वाटते. न जाणो फट् म्हणता ब्रम्हहत्या व्हावयाची त्यापेक्षां प्रक्षालनातुहि

पकस्य दूरादस्पर्शनम् वरम्. या न्यायाने ते त्या भानगडींतच पडत नाहींत आणि हें जाणून कांहीं मुली प्रोफेसराना चार चौघादेखत मुद्दाम नमस्कार करतात. कांहीं तरी काम काढतात. उगाच घोटाळत राहून त्याना घाबरवतात. परतु प्रो. वसिष्ट विद्यार्थिनींच्या या प्रयोगाला हार गेले नाहीत. ते विद्यार्थिनींचाहि नमस्कार अगदीं विद्यार्थ्यांच्या नमस्काराइतक्याच मनमोकळेपणाने हसतमुखाने स्वीकारीत ! विद्यार्थिनीशीहि प्रसगी गप्पागोष्टी करताना ते घाबरत नसत. परतु त्या आपणहून बोलावयास आल्या तर ! त्यावेळीं भोवतालचे विद्यार्थी प्रो. वसिष्टाबद्दल जरा आश्चर्याने बोलत, " म्हातारा दिसतो तितका रुक्ष नाहीं बर का ! रसिक आहे चागला ! "

प्रो. वसिष्टाच्या या वागणुकीमुळे ते विद्यार्थ्यांना फार प्रिय झाले होते व त्याची गैरहजेरी विद्यार्थ्यांना फार जाणवली. ते वर्गांत शिकवू लागले की, ग्रथ बाजूला करून प्रत्यक्ष ग्रथकारच जिवत होऊन बोलू लागला आहे, असे विद्यार्थ्यांना वाटे. सर्व वर्ग तन्मय होऊन जाई, परतु तास सपल्याबरोबर प्रो. वसिष्ट आपल्या मूळच्या अथांग गाभीर्यात बुडून जात.

प्रो. वसिष्टाच्या गैरहजेरीत त्याच्या अध्यापनकौशल्याची विद्यार्थि वारवार आठवण काढीत. आणि ते आले त्यावेळीं सर्वांना आनद झाला. वडिलाच्या मृत्युमुळे त्याच्यात दर्शनी कांहींहि फरक दिसत नव्हता.

आपली सर्व वडिलोपार्जित इस्टेट विकून टाकून रोख पैसे करून प्रोफेसरमजकूर परत आले होते. त्याच्या खोलीतला ग्रथसग्रह एकदम वाढला.

ते परत आल्यावर सांत्वनाच्या निमित्ताने त्याच्या खोलीत जावयाचें असे अरुधतीने ठरविले होते.

एक दिवस सध्याकाळीं ती मोठा धीर करून त्यांच्याकडे गेली. दारावर टॅपिंग केलें तरी ओ येईना !

तिने पुन्हां टॅपिंग केलें व सर म्हणून मोठ्यानें हांक मारली.

दार उघडलें. हातांत एक जाडा ग्रंथ. तांबडी पेन्सिल अशा थाटांत प्रो. वशिष्ट दाराशीं आले.

" कोण पाहिजे तुम्हाला ? "

" तुम्हींच !"

" मी ? या—आंत या "

कोण पाहिजे या प्रश्नाने अरुंधती आधीच नामोहरम झाली होती. अगदीं घाबरली होती.

डॉ. वसिष्टाच्या खोलींत सगळीकडे पुस्तकेच पुस्तके पडलीं होतीं. एका बाकावर थोडी जागा मोकळी होती तेथे ती बसली.

दार उघडेच होते. दाराच्या समोर दूर काही विद्यार्थि उभे होते.

अरुधतीला फारच घाबरल्यासारखे वाटले. उगीच आपण आलो असा तिला पश्चात्ताप झाला.

प्रो. वसिष्ट मात्र शात होते. ते आपल्या टेबलाजवळच्या खुर्चीवर बसले.

" काय काम आहे तुमचे ? "

" मला कळले, तुमचे वडील—"

" हो. मी नोटीसच लावली होती. "

" मी दुःख व्यक्त करायला आलें आहे."

" आभारी आहे मी तुमचा. असो. फार प्रेम होते त्याचे माझ्या-वर. त्यांनीं मला ही देणगी देऊन ठेवली आहे. " खोलीभर पसरलेल्या पुस्तकाकडे हात करीत ते म्हणाले.

" तुम्हाला कटाळा नाहीं येत नेहमीं पुस्तके वाचण्याचा ? " अरुंधतीला थोडा धीर आला.

" मला हीच सवय आहे. माझ्या वडिलांनीं मला ही लावली आहे. संवयीवर आहे सगळे काहीं. "

काही केल्या संभाषणाला मार्ग दिसेना. अरूधतीची कल्पना फार निराळी होती. एक तरुण स्त्री आल्यावर निदान दाक्षिण्य म्हणून तरी हा मुनिवर्य जरा निराळा वागेल, असे तिला वाटले होते. परतु तसें कांहीं झाले नाही. ती थोड्याच वेळांत उठली.

" काय निघालात ? "

" होय. तुमचा महत्त्वाचा वेळ मोडतो. "

तसे कांही नाही. बसा कीं, असे न म्हणतां प्रो. वसिष्ट म्हणाले—

" होय निदान आवडीचा वेळ तरी खास. तुमचे काम झाले ना ?

" होय. येतं मी. नमस्कार ! "

" नमस्कार !"

पुन्हा दार बद. अरुधतीकडे समोरचे विद्यार्थि पहात होते. ती उगाच चेहऱ्यावर काही तरी पराक्रम केल्याची ऐट आणून तेथून निघून गेली.

त्यानतर तिचे प्रो. वसिष्ठाविषयींचे मत तयार होऊ लागले. तिच्या थिल्लर मनाला आपल्या भोवतालच्या तरुणाना उगाच निर्हेतुकपणें अस्वस्थ करण्याची खोड होती. मोठी मजा वाटे त्यात तिला. परतु प्रो. वसिष्ठाच्या बाबतीत तिला पराभव पत्करावा लागला. ती त्या दिवसा-नतर त्याच्याकडे फारशी गेलीच नाही. त्यांनी कधीं आपल्या कृतींत फरक दाखवलाच नाहीं.

---

# स्वातंत्र्य कीं स्वेच्छाचार

## प्रकरण ४ थें.

कॉलेजचा अभ्यासक्रम सपला तरी प्रो. वसिष्ट ही व्यक्ति अरुधती-च्या आठवणीत राहून गेली होती. पुढे प्रो. वसिष्ट एम्. ए. झाले. पी. एच्. डी. झाले. अरुधतीने त्याना अभिनदनाची पत्रे पाठविली व त्यांनीहि "आभारी आहे" एवढेच उत्तरहि पाठवले. नतर एका कॉलेजात प्रोफेसर म्हणून ते कायम झाले. त्यांच्या घरातील ग्रथसभार वाढत होता व ते त्या ग्रथसमुद्रात खोल-खोल जात होते. आणि समाजात जास्त जास्त अदृश्य होत चालले होते. परतु कांहीं वर्षे गेल्यावर त्याच्या जीवनात पूर्वी कधीहि न आलेले असे औदासिन्य मधूनमधून डोकावू लागले. प्रत्येक गोष्टीचा अत्यंत शास्त्रशुद्धरीतीने ते विचार करीत असत. आपल्या जीवितक्रमा-बद्दलीह त्यानी स्वतःशी शास्त्रीय चिकित्सा केलेली होती.

या चिकित्सेचाच विवाह हा एक भाग होता. स्त्रीसहवासाची नैसर्गिक इच्छा केव्हा केव्हा तीव्रपणे त्याच्या मनांत डोकावूं लागे. परतु त्यावेळी आपल्या जीवनास लागलेले वळण किती विलक्षण आहे याचीहि त्याना जाणीव होई. ससाराचा पसारा मांडावयास आपल्या जीवनात जागा नाही. आपल्या वृत्तीला एकाद्या व्यक्तीचे मन वळविणे, जिकणे, रजविणे, वगैरे गोष्टी जमणार नाहीत. अशा स्थितीत सामान्यवृत्तीची कोणचीही स्त्री आपल्याशीं विवाह करून एकाताने झुरून मरेल! व्यवहारी जगास आपला जीवनक्रम पसत पडत नाही याचे त्याना पुष्कळ वेळां अनुभव आले होते. त्या व्यवहारी जगांत, त्या बहु-जनांच्या जगांत आपल्या वृत्तीला जमेल अशी सहचारिणी मिळणे शक्य नाहीं हे त्यांना स्पष्टपणे कळत होते. आणि ते थोडाशा व्यग्रतेनंतर पुन्हां आपल्या ग्रांथिक जीवनांत बुडी मारीत.

त्यांच्या विद्वत्तेमुळे त्यांना निरनिराळ्या व्यवसायक्षेत्रात सस्था-सभा समेलनाच्या निमित्ताने जावे लागे. तेथे त्याच्या अविवाहित जीवनाबद्दल एक कुतूहल माजे, भोवतालच्या जगात प्रसगविशेषाने वावरताना डॉ. वसिष्ठहि कुतूहलाने पहात की आपल्या वृत्तीला साथ देणारी कोणीहि व्यक्ति दिसत नाहीं. ससाराची हजारो चित्रे त्यांनी ग्रंथांतून वाचली होती, बरींच पाहिली होतीं आणि योग्य सहचारिणी-बद्दलच्या त्याच्या अपेक्षा इतर अनेक वृत्तीप्रमाणेच मृतप्राय होत चालल्या होत्या.

अरुधतीचेहि जीवन असेच चालले होते. जीविताविषयींच्या तिच्या कल्पना काहीशा असामान्य होत्या. व्यक्तिस्वातत्र्य व स्वेच्छाचार यातील अतर तिच्या अनुभवास आले नव्हते. तिला कोणी सागितलेहि नव्हते. श्रीमत, सुधारक व सुशिक्षित घराण्यात जन्मल्यामुळे तिच्यावर कोणचेहि बधन नव्हते. तिचे तीच निरनिराळे प्रयोग करी आणि अनुमाने काढी. "स्त्रीला विवाहावाचून राहता आले पाहिजे. सुशिक्षित स्त्रीला पुरुषसहवासाचा धसका वाटण्याचे कारण नाही. विवाह हा काही नैसर्गिक गरजा भागविण्यासाठी दोघानी केलेला समेट आहे. ते बधन नाही." इत्यादि मतें ही तिचीं अनुमाने होती.

'आपण पुरुषाना भीत नाही.' हे दाखविण्यासाठीं ती कोणच्याही तरुणाशी मैत्रिणीइतक्या मनमोकळेपणाने बोलत चालत असे. एखादे विशेष यश मिळविण्याच्या विद्यार्थ्याचे त्याच्या खोलीवर किंवा घरी जाऊन अभिनदन करणे व आपण स्वतः हात पुढे करून हस्तादोलन मिळविणे हा तिच्या पराक्रमाचा एक भाग होता. एकदा क्रिकेटच्या क्रीडांगणात एका विद्यार्थ्याने मोठा पराक्रम केला. तेथे अरुधती हजर होती. नुसत्या टाळ्या वाजवून ती स्वस्थ बसली नाही. स्वतः सायकल-वरून जाऊन तिनें एक हार आणला आणि आपल्या हाताने त्या विद्या-र्थ्याच्या गळ्यांत घातला! या तिच्या वागणुकीनें तिने आपल्या भोंवतीं फार मोठें परिचयक्षेत्र तयार केलं होतें. त्या परिचि-

तांच्या मनांत काही वेडेवाकडे विचार असत, ते आपले विचार कांहीं विशिष्ट तऱ्हेच्या वर्तनाने व्यक्तहि करीत. परतु त्यांना आळा घालणें हें भेकडपणाचे लक्षण आहे असे अरुधतीचे मत होते. या मताच्या आहारीं गेल्यामुळे तिलाही त्या विद्यार्थ्यांच्या खुल्या दिलाच्या सहवासाची अभिलाषा उत्पन्न झाली होती. परतु त्या अभिलाषेची सवय लागत असतांनाहि तिला त्या अभिलाषेचे स्वरूप कळले नव्हते. आधुनिक स्त्री-पुरुषाची खेळाडू मनोवृत्ति असे त्याचे गोडस नाव तिने ठेवले होते.

अशा जीवनक्रमात भटकत असता स्वतःच्या वैयक्तिक मार्गाविषयींहि ती हळूहळू विचार करू लागली. आपण स्वतःच्या पसतीने विवाह करावयाचा हे तिने ठरविलें व तिला शक्यही होते. आपल्या मतस्वातंत्र्यावर, व्यक्तिस्वातत्र्यावर, आचारस्वातत्र्यावर कोणाचेहि बधन स्वीकारावयाचे नाही असे तिचे ठरले होते. आणि ते तसा वैवाहिकसबध मिळविण्यासाठी ती आपल्या भोवतालचे जग पाहू लागलीं. तिच्या वैवाहिक जीवनाची योजना पार पाडण्यासाठीं, पति हा चागलाच पगारदार असणे जरूर होते. स्वतःचा भरपूर व्यवसाय असलेला, ससाराची कल्पना अत्यत आधुनिक असलेला असा असणे आवश्यक होत.

अशा अपेक्षेने ती वावरत असता तिच्या भोवतालचे किती तरी प्रेमवीर तिला दूर लोटावे लागले. आणि त्यानी सूड म्हणून तिच्याबद्दल नाही नाही त्या कड्या उठविल्या.

शिक्षण पुरे झाल्यावर रिकामपणची हौस म्हणून तिने शिक्षकिणीची नोकरी पत्करली होती. सगळीकडे तिच्या मताचा बोभाटा झाला व तिला एक विचित्र असामान्यत्व मिळाले. आपल्या बुद्धिवैभवानें, वक्तृत्वाने, निर्भीडपणाने, ती लोकांना वारवार थक्क करी. आणि " हें प्रकरण कांहीं निराळेंच आहे " असे लोक उद्गार काढीत !

समाजांतल्या स्त्रीवर्गात अरुधतीसारख्या स्त्रियांचा एक विशिष्ट वर्ग तयार होतो. त्यांच्या सहवासाची अपेक्षा भोवतालीं तयार होते. कारण

त्या आपल्या आधुनिकतेच्या खोट्या कल्पनेने व ऐटीने समाजात अनिर्बंधपणे वावरत असतात. स्वसरक्षणाची काहीशी खात्री असल्याने त्याना कोठेहि सचार करण्याची भीति वाटत नाही. आपली मते चव्हाट्यावर सागण्यास त्या घाबरत नाहीत. पुरुष जातीचा निषेध करणे ही त्याची हौस असते. आपण त्या हजारो वर्षांच्या गुलामगिरीतून स्त्रियाना सोडविण्यासाठी जन्मास आलो आहोत अशी त्याची गर्जना असते. आणि लोकहि त्याचे कौतुक करतात. परतु अशा युवतीना ससारात सहचारिणी म्हणून पत्करण्यास युवक दचकत असतात. कारण, आपल्या बहुजनसमाजातील तरुण गृहसौख्यासाठी विवाह करतात. घर हे त्याचे विश्रातिस्थान असते. विश्रातीची आजन्म निश्चित सोय ही त्याची ससाराची कल्पना असते. त्यामुळे समाजात विविध क्षेत्रात सचार करणाऱ्या व्यक्तिस्वातत्र्यवादी, स्त्रीस्वातत्र्यवादी युवतीविषयी सर्व आदर दाखवतील, त्याच्या सहवासासाठी तळमळतील परतु आपल्याबरोबर त्याना आयुष्याची सोबतीण म्हणून मात्र पत्करणार नाहीत.

अरुंधतीला हा अनुभव येऊ लागला होता. आपल्यासारख्याच मताचा सार्वजनिक कार्य करणारा. विद्वान् असा जोडीदार मिळाला तरच विवाह करावयाचा असे तिने ठरविले. कारण सामान्य समाजात तिच्याशी जीविताची जोडीदारी पत्करावयास कोणीही समजस माणूस तयार होईना. तिच्या ‘ मित्र ’ ( ? ) मडळीत तिचे दिखाऊ आराधान करणारे पुष्कळ असत. परतु त्या आराधनेत तिला ‘फुलपांखरू’ वृत्तिच असल्याचे आढळून आले. विवाहाच्या निश्चित ध्येयाने तिनेहि पुष्कळाचें अनुरजन केले. परतु तिला कोठेहि दुजोरा मिळाला नाहीं.

समाजांतील तरुण वर्गाबद्दल तिला अनुभव असा आला की, मध्यम स्थितींतले लोक आपली श्रीमंती, आचारस्वातत्र्य, धैर्य इत्यादि

गुणांना घाबरतात तर श्रीमत युवक आपल्यांतील आधुनिकत्वामुळे स्त्रीत्व विकृत झाले आहे असे समजतात.

अशा स्थितीत ती स्वतः वरसशोधन करीत होती. तिचे वडीलहि या बाबतीत लक्ष घालीत होते. श्रीमत सुधारकांपैकीं असल्यानं एक फॅशन म्हणून निरनिराळ्या समाजसुधारणांना नावनिशीवार समति देत असत. तसल्या सगळ्या सघाचे ते सभासद होते. त्यात आधुनिक विवाह मडळाचेहि ते सभासद होते.

---

# विवाहाचे दलाल

## प्रकरण ५ वें.

विवाहमंडळाचे एक चिटणीस झेड्. मारुतिराव यांचे अरुंधतीच्या घरी बरेच येणे जाणे असे. मारुतिराव ही एक व्यक्ति नसून 'वल्लि' होती. त्याच्या जीवनाच्या दर्शनी भागावरून तो कोणावरहि सहज छाप पाडीत असे. बोलणे, चालणे इतके मादक की लोक त्याच्यावर सहज खूष होत. तो विवाहमंडळाप्रमाणेच विधवा विवाह-मंडळाचाहि चिटणीस होता. विवाह मंडळाचीच विधवा विवाह-मंडळ ही एक शाखा होती. स्वतः अविवाहित राहूनहि या विवाह मंडळाचा चिटणीस म्हणून त्यानें चांगला लौकिक मिळविला होता. त्याच्या कार्यकुशलतेचे ते एक गमक होते. त्याच्याबद्दल कोठेहि कडी सुद्धा नव्हती; मग साधार बदनामी तर दूरच.

गांवातील अविवाहित सुशिक्षित युवकयुवतींची त्यास बिनचूक माहिती असे. लोकचर्चेचा विषय झालेल्या तरुण तरुणींच्या हालचालीं-वर याची बारीक नजर असे. कोणच्या ना कोणच्या तरी निमित्तानें तो त्यांच्याशी परिचय करून घेई आणि विवाहपूर्व परिचयात काही भान-गडी झाल्यास त्यांना मदत करण्यास हा नेहमी सिद्ध असे. त्यामुळे कोर्टाच्या कामातील काही विशेष स्वरूपाच्या खटल्यात काही वकीलाची जशी प्रसिद्धी असते तशी विवाहपूर्व भानगडीतून पार पडण्याच्या कामीं साहाय्यक म्हणून झेड्. मारुतिरावची ख्याती होती. त्याने आपला हा व्यवसाय धनदायी करून दाखविला होता. 'विवाह' या नावाची अडचण नको म्हणून त्याने एक सुधारणा-मंडळ काढले होते. तरुण स्त्रीपुरुषांना राजरोसपणे एकत्र येऊन प्रणयाराधन करण्याचे ते एक ठिकाण होते. समाजात असें एखादें 'निर्धास्त' स्थान असावें असें कितीतरी तरुण-तरुणींना वाटत असे व त्यामुळे या सुधारणा-मंडळाची सभासदसंख्या बरीच

मोठी होती. मडळाची इभ्रत टिकविण्यासाठीं नवमतवाद, समाज-सत्तावाद, सामाजिक सुधारणा या विषयांवर मोठमोठ्या विद्वानाचीं व्याख्यानेंहि या मंडळांत होत. तरुणपिढीचें एक सामर्थ्य केद्र येथे उत्पन्न झाले आहे असा या समाज सुधारणा—मडळाने लौकिक मिळविला होता आणि झेड्—मारुतिरावाकडे त्याचे सगळे श्रेय !

अरुधती ही त्या मडळाची सभासद झाली. कारण सभासद होणे हें पुरोगामीपणाचे ढोबळ लक्षण समजले जात असे. अरुधतीचे वडील तर या मडळाच्या कार्यकारीमडळात होते. त्यामुळे मारुतिरावचे अरुधतीकडे बरेच जाणे येणे असे. शिवाय अरुधतीमध्ये वक्तृत्वादि गुण होते. मडळात तिचा किती तरी उपयोग होत होता.

हळूहळू अरुधतीच्या मनाचा कानोसा मारुतराव घेत होते. अरु-धतीशी त्याचा परिचय वाढत होता. परतु मारुतिरावची वागण्याची एक खुबी अशी कीं, ‘तसल्या’ परिचयात तो नेहमी आदर्श सभ्यतेच शिफा रसपत्र मिळवी. त्याच्या जीवनाबद्दल कोणालाहि फारशी माहिती नव्हती. तो कोठचा कोण, त्या गांवी केव्हा आला, शिकला किती, समाज-सुधारक कां झाला, लग्न का करीत नाही. त्याला पैसे कोठून किती मिळतात, वगैरे बद्दल निश्चित माहिती असणारे चार सुद्धा लोक साप-डणें कठीण होते. या माहितीबद्दलची उणीव मारुतिराव कोणालाही भासू देत नसे. त्याच्या वागणुकीच्या कौशल्याने व त्याने चालविलेल्या मंडळाच्या ‘उपयुक्तते’ मुळे तो लोकप्रिय झाला होता.

अरुधतीला सभासमेलनातून ‘पुढे’ आणण्याच्या त्याच्या धरपडी-मुळें तिला तो जास्तच चागला वाटे व तिच्या वडिलानाहि त्यांत कांहीं गैर दिसले नाही.

परिचयाच्या ओघात एक दिवस झेड्. मारुतिरावनें अरूधतीला विवाहमडळाचे सभासद करून घेतले. त्या दिवशीं तो त्या कार्याचा निश्चय करूनच आला होता.

अरूधतीच्या शाळेला कांही तरी बायकी सुटी होती. दुपारीं २—२।। चा सुमार होता. अरुधती आपल्या खोलींत कांहीं वाचीत

बसली होती. मारुतिराव आधीं घरात अरुधतीच्या आईशीं चार गप्पा ठोकून मग ' ताईसाहेबाना एक व्याख्यानाचे आमत्रण द्यावयाचें आहे ' असे म्हणत वर चढले.

" काय ताईसाहेब, काय चालल आहे ? "

" का ऽ हीं नाही. मी काय तुमच्यासारखी कार्यकर्ती आहे ? "

" सुदैवी आहात बुवा ! पहा आमचे जीवन. ऊन नाही, तहान नाहीं. सारखा भटकत असतो. "

" घर नाहीं दार नाही म्हणन भटकता. "

" खर आहे तुमच म्हणण. '

" पण का करीत नाही घरदार तुम्ही ? "

" भटकायचा व्यवसाय पत्करला आहे म्हणून ! "

" कोणी सक्ति केली आहे ? "

" खुषीची सक्ति. मला फार गोडी वाटते या कामात. माझ्या मायेचीं देवाने दिलेली कोणी माणसे राहिली नाहीत. म्हणून मी मनाने ठरविले. देवाने दिलेले टिकले नाहीं, तेव्हा आपण मिळविलेले काय टिकणार आहे ? काही म्हणा. मला कधी आठवणसुद्धा होत नाही. माझ्यामुळे चार लोक सुखी होतात यातच मला आनद वाटतो."

" आहे खर. नाही तर कोण ही कामे करणार आहे ? "

" थट्टा नाही सागत मी ! मला अशी कितीतरी तरुण मडळी माहित आहेत की, जी मी धडपड केली नसती, तर जन्मभर दुःखी झालीं असती किंवा आत्महत्या करून मरून तरी गेली असती. "

" वाः ! खूपच श्रेय ओढता तुम्ही स्वतःकडे ! "

" श्रेयाचा प्रश्न नाहीं हा. तुम्हाला त्या अडचणी कळत नाहींत हे आश्चर्य आहे. मला तुम्ही सांगा, असे किती तरुण आहेत कीं, जे आपल्या वडिलांना धिटाईनें सांगू शकतात कीं, माझे अमक्या मुली-वर प्रेम आहे व मी केला तर तिच्याशींच विवाह करणार आहे ? तरुण सुद्धां धजत नाहींत. मग तरुणींची तर गोष्टच सोडा. आपल्या कर्त्या-

करवित्या बापास कोणी सागत नाहीं. त्याहूनहि विशेष म्हणजे एक-मेकानासुद्धा सांगत नाहीत. " तिने नाहीं म्हटले तर–" हा तरुणास धसका. "त्याने झिडकारले तर–" हा तरुणास धसका. आणि यामुळे शेवटीं होते काय---प्रौढ विवाहात विवाहपूर्व प्रेमबध एकीकडे व विवाह-जन्य सबध दुसरीकडे अशी रस्सीखेच चालूं होते. जीविताचे तुकडे तुकडे होतात. प्रियकरहि दुःखी, पतिहि दुःखी, त्पनी दुःखी, प्रियाहि दुःखी.---हे सगळे का होत, तर तरुण–तरुणींच्या भावना एकमेकांना कळण्याचे काही माध्यम नाही म्हणून. आपल्या मुग्धप्रेमाला वाचा फुटण्याची वाट पाहून कटाळून शेवटी तो किंवा ती विवाहाचा व्यवहार उरकून टाकतात आणि मग त्याना कळते कीं, खरोखरच तिचें आपल्यावर किवा त्याचे आपल्यावर प्रेम होतें; पण आपण बोलण्याचा धीर केला नाहीं. फार भेसूर कुचबणा आहे ही ! मला माहीत असलेली काहीं उदाहरणे तुम्हाला सागितली तर तुम्हाला धक्का बसेल. म्हणून तरुणपिढीचे परिचयक्षेत्र वाढ-वावयांस पाहिजे. यासाठीं मी हीं मडळे काढतो, चालवतो. तरुण-तरुणींना भेटतो आणि शिव्याशापाची पर्वा न करता त्याच्या पाल-काकडे मध्यस्थीं करतो. माझा तर अनुभव असा आहे की, पाल-काना पुष्कळ वेळा मुलामुलींचे हे मूक अनुबध कळतच नाहींत. त्याना वाटतें तसे का ऽ हीं नाहीं. मुलींह सागतात " छट् ! तसे कां ऽ हीं नाहीं. ! " पालकहि समजस असतात. माझ्या मध्यस्थीला धुडकावणारे असे फारच थोडे पालक मला भेटले. "

" आहे. खरच तुमच्या सस्थेचे कार्य फार मोठे आहे. "

" पण मला नुसता सदेश नको. मला सहकार्य पाहिजे आहे. "

" माझें ! म्हणजे ? "

" दचकू नका. मी म्हणतों तुम्ही स्वतः नांव कां नोंदवीत नाहीं ? "

" माझी मी समर्थ आहे कीं ! माझें स्थळ शोधण्याइतकें स्वातंत्र्य मला आहे. "

" त्या स्वातंत्र्याला कोठे बाध येतो? तुमच्या शोधाला मी मदत करीन. माझ्या संस्थेला तुमचा धन्यवाद मिळेल. लोकाना विश्वास वाटेल. कांही भानगडी गरज् माणसासाठी ही संस्था आहे अशी काही लोकांची जी समजूत ती दूर करावयाची आहे. म्हणून म्हणतो तुम्ही विवाह मंडळाच्या सभासद व्हा. "

" पण बाबाना विचारावयास नको? "

" तुम्हाला सुद्धा विचारावें लागते का? तुम्ही एवढा विश्वास संपादन केला नाही वडिलाचा? "

" विश्वासाचा प्रश्न नाही. पण—"

" पणबिण काही नाही. मी आज तुमचे नाव नोंदविणारच आहे. हा घ्या फॉर्म, सगळा भरला आहे. फक्त सही करा येथे! "

शेवटी अरुंधतीची सही झेड्. मारुतिरावानीं मिळविलीच.

नंतर फॉर्म खिशात घालीत तो म्हणाला—

" तुम्ही आपल्या सर्व गुणाचे चीज होईल असे स्थळ मिळेपर्यंत विवाह करू नका. माझ्यावर सोपवा ते काम. तुमच्या गुणानंतर विवाहानें पांघरूण पडता कामा नये. उजळा आला पाहिजे. "

"अरे वा! बरंच वाटतं की, तुम्हाला माझ्याबद्दल!" अरुंधतीच्या या बोलण्यातली खोच मारुतिरावच्या लक्ष्यात आली होती. परंतु ते त्याने दाखवले असते तर तो मारुतिराव कसचा? तो सगळे पटकन् गिळून शांत!

"वेळ आली की, सांगेन मला किती अन् काय वाटत ते! त्यावेळीं मात्र मारुतिरावला विसरू नका. नाहीं तर आपल्या संसारात दंग होऊन जाल. "

" छेः! छेः! तुम्हाला बोलवीन ना. साक्षीलाच बोलवीन. मी रजिस्टर करणार आहे. "

" यांत काय शंका आहे! अगदीं परत पावतीच रजिस्टर करायला पाहिजे. "

मारुतिराव उठत उठत उठत खूप मोठ्याने हसला आणि त्या हसण्याच्या भरांत त्यानें टाळीसाठी अरुधतीपुढे हात केला. अरुधतीनेहि अगदी यांत्रिकपणें हात पुढें केला. मारुतिरावाने टाळी न मारता हस्तादोलन केलें ! त्याबरोबर अरुधतीने हात सोडवून घेण्यासाठीं मागे खेचला. परंतु मोठ्यानें हसत हसत, हात कांही क्षण तसाच दाबून मारुतिराव म्हणाला—

" माफ करा अ ! "

———

# हाहि योगायोगच !

## प्रकरण ६ वें.

झेड्. मारुतिराव याच्या मध्यस्थीनें अरुंधतीचे वरसंशोधन चालले होतें आणि तिचे वडीलहि या कामीं तिच्या छंदाने खटपट करीत होते.

मारुतराव निरनिराळी स्थळे चर्चेसाठी घेऊन येई परंतु अरुंधतीस ती पटेनात. आणि नतर तिच्या पसती—नापसतीची पूर्ण कल्पना असूनहि चर्चेसाठी काही ठिकाणे आणण्याचा मारुतिरावचा क्रम चालूच राहिला. वयपरत्वे अरुंधती एका विशिष्ट मनःस्थितीत दिवस काढीत होती. मारुतिराव ब ओळखूनच तिला रुचेल असे वागत होता. आपल्यासाठी हा गृहस्थ किती वणवण करीत आहे हा भाव त्याने अरुंधतीच्या मनात ठसविला. आणि तिला शकासुद्धा येऊ न देता तो अरुंधतीच्या सहवासाची आपली इच्छा तृप्त करीत होता. " मनासारखे स्थळ मिळणं किती कठीण ! " असं मारुतिरावने अरुंधतीस पटविले होते. तिने काही आधुनिक विवाहितांची नांवे घेतल्यास मारुतिराव आपल्या अवातर ज्ञानाच्या जोरावर वाटेल त्या थापा मारून ते जोडपे अत्यत दुःखी आहे असं पटवून देत असे. आणि अरुंधती पुन्हा जास्तच अस्वस्थ होई. तो पुन्हा तिला धीर देई.

एक दिवस मारुतिराव आला, तो डॉ. वसिष्ठाचे नाव घेतच आला.

" तुम्हाला पाहिजे तसे स्थळ आणले आहे. "

"कोणचे ? "

"डॉ. वसिष्ट एम्. ए. पी. एच्. डी. "

"काय ? डॉ. वसिष्ठ विवाह करणार आहेत ? "

"म्हणजे ? मी थाप मारतो असं वाटत की काय ? "

"मला खर वाटत नाहीं. "

"का ? तुम्हाला खरखोट कळण्याइतकी माहिती आहे त्यांची ? "

"हो. म्हणून तर सांगते. ते आमचे प्रोफेसर होते. "

" मग तर पैज. नुसता रजिस्टर विवाह नाही. प्रेमविवाह होणार आहे हा. "

" काय चावटपणा करता मारुतिराव! मी त्याची विद्यार्थिनी होते, म्हणजे प्रिया नव्हत "

" विद्यार्थिनी होतात म्हणजे परिचय होतो ना? आम्हाला पुरे तेवढे. "

" पण वसिष्ट विवाह करणार आहेत हे कशावरून ? "

खिशातून एक कागद काढीत मारुतिराव म्हणाले—" हे पहा. खात्री करून घ्या. आणि पुढच सगळे माझ्यावर सोपवा. "

अरुधती डां. वसिष्टांनी भरलेला फॉर्म वाचीत होती. त्या वेळी मारुतिराव तिच्या चेहऱ्याकडे पहात होता. हा प्रेमविवाह ठरणार, अशी त्याची खात्री होत चालली.

अरुधतीने फॉर्म खाली ठेवला.

" काय ? झाली खात्री ? "

" होय. तुम्हांला डॉक्टर स्वतः भेटले होते ?"

" अर्थात्. मी स्वतः फॉर्म भरून घेतला आहे. "

" काय, म्हणता काय ? तुमची कर्तबगारी काही और आहे. "

" तुम्हांला दाखविली नाही का तुमचा फॉर्म भरून घतला त्या दिवशी ? "

त्या दिवशीच्या हस्तादोलनाचा प्रसग आठवून अरुधती जरा क्रुद्ध झाल्यासारखी दिसली. ते पाहिल्याबरोबर मारुतिराव म्हणाला—

" मी खरच माफी मागतो पुनः तुमची. मला वाटल तुम्ही मला ओळखता. त्यादिवशी तुमच्यासारखी विदुषी माझ्या मडळाची सभासद झाल्याबद्दल मला इतका आनद झाला की, मी बेभान झालो. आनदाच्या भरांत शेजारच्या माणसाच्या पाठीवर थाप मारणे, टाळी देणे एकदम मिठी मारणें—"

" ह–मारुतिराव बहकत चाललात !

मारुतिराव एकदम स्तब्ध झाला. त्याने एकदम नूर बदलला. डोळे रोखून तो म्हणाला—

" काय ?–मलाच म्हणालात ? माणसाची चागली पारख आहे तुम्हाला. तुम्हाला काय वाटते ? "

मारुतिरावचा हा अभिनय इतका हुबेहुब वठला की, अरुधती घाबरूनच गेली. तिला रडू कोसळावयाच्या बेतात आले. तिचा चेहरा मलूल झाला. कापऱ्या आवाजात ती म्हणाली–

" माफ करा अ. मी थट्टेन म्हटले, माझा तुमच्यावर विश्वास नसता तर मी तुमच्याशी इतका परिचय होऊ दिला असता कां ? तुम्ही आमच्या कुटुबापैकी एक आहात. "

" बर जाऊ द्या ते ! मला काहि वाटत नाही त्याबद्दल. काय मत आहे तुमचे ?"

" काय असावयाचे मत ? त्यानाच विचारा माझ्या विषयीचे त्याचे मत. उगाच मला चढवू नका. "

" चढवायचा प्रश्न नाही. परतु मला कल्पना नव्हती तुम्ही समीत व्याल अशी "

" का ? "

' तुम्हाला जास्त कळत असेल अशी माझी कल्पना होती हे पहा. तुमच्या वृत्तीला तो मुनि मानवणार नाही. "

" त्याचा सहवास ही भाग्याची गोष्ट समजेन मी ! "

" विवाहाचा विचार हा एक स्वतत्र विषय आहे. त्यात नुसते विद्वान् पुष्कळवेळां अपयशी ठरतात. तुम्हाला क्षणभर ही हौस वाटते पण ती टिकणार नाही. विद्याध्ययनाची इतकी आवड असण्यासारखे तुमचे मन नाही. फार निराळीं माणसे असतात ती. माफ करा स्पष्ट बोलतो याबद्दल; पण माझा अनुभव आहे की, अलीकडल्या मुलीना आपली वेषभूषा, सौंदर्य, पोषाखपद्धति याप्रमाणेच वैवाहिक जीवन

हीहि एक मिरविण्याची बाब वाटते. प्रो. वसिष्ठ हा त्यांतला माणूस नाहीं. तुम्हाला आपला विवाह आणि वैवाहिक जीवन याचे प्रदर्शन करतां येणार नाहीं. ”

“ मी तुमची कल्पना बदलून दाखवीन. तुम्हीं म्हणता त्यातली मी नाहीं, हे मी तुम्हाला पटवीन. आधुनिक तरुणी एखाद्या विद्वानाची सहचारिणी होण्याइतकी लायक असू शकते. ती बौद्धिक सहवास देऊ शकते, पोरेबाळे आणि स्वयंपाकपाणी यापेक्षा अत्यंत उच्च वातावरणांत ती जगू शकते हे मी तुम्हाला आणि जगाला दाखवूं शकेन ! ”

“ हिअर—हिअर— ! ’ मारुतिराव टाळ्या वाजवीत म्हणाला.

नंतर त्यानं आणखी एकदां खिशात हात घालून दुसरं पत्र काढले.

ते डॉ. वसिष्ठाचे होते. त्यांना मारुतिरावाने अरुधतीची माहिती कळविल्यावर त्यांनीं उत्तरादाखल लिहिले होते—“विवाह हा एक प्रयोग आहे. तो व्यवसाय नाही. स्त्री—पुरुषाचा सहवास हा वैयक्तिक जीवनाच्या उन्नतीस कितपत साहाय्यक होतो हे पाहण्याचा एक प्रयत्न-प्रयोग म्हणजे विवाह अशी माझी कल्पना आहे. संसाराची व्यावहारिक चित्रे मनासमोर ठेवणारी स्त्री माझ्याशी विवाह करून दुःखी होईल. अरुधतीस हे सर्व नीट समजावून सांगा आणि मग मला कळवा ! ”

“ झालं वाचून? काय कळवायंच ? ”

“ हो ! ”

“ विचार केलात? हौस म्हणून याकडे पाहू नका. ”

“ हो. पूर्ण विचार केला. परंतु तुम्हीच बाबाच्याजवळ सगळे बोला.”

“ आमच्या व्यवसायाचे वैशिष्ट्यच आहे ते. ते सगळं बरोबर करतो. तुम्ही पूर्ण विचार करून काय तें सांगा. विचार बदलला तरी बदलल्याबरोबर सांगा. चित्रात हिमालय पाहून तेथ राहावेसे वाटणं ही हौस झाली. परंतु प्रत्यक्ष तेथें गेल्यावर थंडीने गारठून मरावयाची वेळ येते,

हा अनुभव चित्रात दाखविलेला नसतो. त्याचा अदाज आपण करावयाचा असतो. तेव्हा हौशीला बळी पडू नका. जातो मी !"

×   ×   ×   +   ×   +

आणि योगायोग असा की, डॉ. वसिष्ट व अरुधती याचें खरोखरच लग्न ठरले. मारुतिरावाने शेवटपर्यंत पुढाकार घेतला. डॉ. वसिष्ठांचे व अरुधतीचे धन्यवाद मिळविले. परतु मनात मात्र तो म्हणत होता, "काय खुळी पोर आहे ही ! लोक म्हणणार हा आधुनिक विवाह झाला. सहवासोत्तर विवाह झाला. एकमेकाना एकमेकाची माहिती करून राजीखुषीने झाला. परतु जुन्या विवाहपद्धतीतील "योगायोग" म्हणतात, त्यात व यात काय फरक आहे? या पोरीला काय माहित आहे किंवा या वदाततीर्थाला तरी ? हा योगायोग आणि त्याचा मी याजक !"

---

# ही सगळी माया आहे.



## प्रकरण ७ वें.

डॉ. वसिष्ठ आणि अरुधती ही आपल्या विवाहाकडे निरनिराळ्या दृष्टीने पहात होतीं. डॉ. वसिष्ठ विवाहाकडे एक प्रयोग या दृष्टीने पाहत होते. तर अरुधतीस विवाह ही एक हौशीची गोष्ट वाटत होती. डॉ. वसिष्ठांशी विवाह करताना एका प्रसिद्ध विद्वानाचा सहवास मिळत आहे, हा एक फार मोठा आनद तिला वाटत होता परतु त्या आन-दाचें उगमस्थान लौकिक जीवनात होतें. तो आनद वैयक्तिक नव्हता. चार लोकात भूषण मिरविण्यासारखे काही तरी मिळविले असे तिला वाटत होत. ते भूषण आहे हे पण लोकानी व्यक्त केले पाहिजे. त्या-साठीं त्या विवाहाचे वैशिष्टय लोकाना पटले पाहिजे. आणि ते पट-विल्याखेरीज कसे पटवणार ? त्याकरितां विवाहसमारभानिमित्त एक मोठी मेजवानी तिने देण्याचे ठरविले.

मेजवानी ठरविण्याचे आणखी एक कारण. त्या दोघांनी रजिस्टर विवाहाची नोटीस दिल्यापासन लोकात तो एक चर्चेचा विषय झाला होता. अरुधतीच्या बाजूने ते एक वैगुण्य आहे असे एक लोकमत होतें, इतक्या दिवस थाबून शेवटा हा मुनिच पत्करला का ? ' अशी लोक आपापसात चर्चा करोत, ती अरुधतीच्या कानापर्यंत येत होती. या विवाहात ऐट मिरविण्यासारखे कांहीं नव्हते. वैवाहिक वैभवांत वराची विद्वत्ता हा फारसा महत्त्वाचा मुद्दा नसतो. त्यापेक्षां वराची सपत्ति-यौवन प्रभुत्व इत्यादि गोष्टी लौकिकात प्रसिद्धि पावतात. "चागले नशिब काढले " असा शेरा ज्या विवाहाबद्दल मिळतो, त्या विवाहांत वरील गोष्टी महत्त्वाच्या असतात. परतु डॉ. वसिष्ठासारखा पति मिळविणे ही कांहीं मोठी लौकिकाची गोष्ट नव्हती. लोक तर म्हणत, '—नाकाने कांदे सोलतासोलतां शेवटीं ही विदुषी एका म्हाताऱ्याच्या गळ्यांत पडली—'

आणि डॉ. वसिष्ठाबद्दल म्हणत '—डॉक्टरने शेवटी शेवटी इतक्या दिवस थाबल्यासरसी जिकली.—' कारण जोडप या दृष्टीने अरुंधती यौवनसपन्न दिसत होती. आपल्या मतस्वातत्र्यामुळे व आचारस्वातत्र्यामुळे तिने लोकास घाबरवले होते. आपल्याबद्दल तरुणाच्या मनात एक दहशत उत्पन्न केली होती. आपल्याला सर्वजण दबकून आहेत याचा आरभी तिला अभिमान वाटत असे. परतु त्यामुळे ती दुर्लभ होऊन होऊन बसली. तिला कोणी पतकरावयास सहसा तयार होईना.

डॉ. वसिष्ठ विवाहाकडे शास्त्रीयदृष्टीने पाहाणारे होते. बरेच वर्षे ते आपल्या जीवनाचा विचार करीत होते. आपल्यामध्ये पूर्णत्व येण्यासाठी वैवाहिक जीवन आवश्यक आहे असे ठाम पटल्यावर त्यानी विवाह करण्याचे ठरविले. प्रणय, विलास, शृगार इत्यादि भावना व वासना उत्पन्न होण्याचे, आणि अनावर होण्याचे त्याचे वय निघून गेले होते. आता एक विशिष्ट तऱ्हेची विश्राति मिळविण्यासाठी मानसिक स्वास्थ्य मिळविण्यासाठी त्यानी विवाह केला. आपल्या अत्यत व्यापक बौद्धिक जीवनात काही विश्रांतीचे क्षण चागले घालविण्यासाठी त्याना विवाहाची जरूर भासली व त्यानी आपली इच्छा प्रकट केली. पत्नि निवडताना तिला आपला जीवितकोण निश्चितपण कळेल इतकी ती प्रौढ असणे जरूर होत. यदाकदाचित् आपले जीवन सलग्न होऊ शकल तर ती असहाय्य होऊन भावनावश होऊन, किंवा व्याकूळ होऊन अगातक होता कामा नये. मैत्रीचा हा एक प्रकार नि प्रयोग आहे अशी तिची दृष्टि पाहिजे. थोडक्यात म्हणजे वैवाहिक जीवन हे तिचे जीवनसर्वस्व असू नये. आपल्या वैयक्तिक व्यवसायातील विश्रातीचे क्षण घालविण्याची सोय अशी तिची विवाहाची समजूत पाहिजे. हे सगळे त्याना स्पष्ट. मारुतिरावाला सांगितले होते. मारुतिरावानी अरुधतीलाहि हे शक्य तितके स्पष्टपणे सांगितले होते. आणि तरी अरुधतीने ते मान्य केले.

परतु लोकानी या दृष्टीने त्याच्या विवाहाकडे पाहिले नाही. सर्व

टीका अरुंधतीवरच होत होती. लोकांना एक प्रकारचे सूडाचे समाधान वाटत होते. आपले व्यक्तिस्वातंत्र्य टिकविण्यासाठीं म्हाताराच नवरा बरा येथपर्यंत टीका झाल्या.

त्या लोकमताचे डोक्यावर फिरणारे ढग दूर करण्यासाठी, हा विवाह आपण राजीखुशीने, अक्कलहुशारीने ठरविला आहे हे दाखविण्यासाठीं आपण काही तरी अलौकिक मिळविलें आहे, हे प्रदर्शित करण्यासाठी तिने विवाहानिमित्त एक मोठी मेजवानी देण्याचे ठरविलें. त्यासाठी सर्व तऱ्हेच्या लोकांना आमंत्रण दिले होते. त्या आपल्या विवाहाबद्दल कुतूहल बाळगणारे, नापसंती दाखविणारे, अभिनंदन करणारे, सर्व तऱ्हेच लोक मेजवानीस आले होते.

प्रेम विवाहितांवर विवाह यशस्वी करून दाखविण्याची जास्त जबाबदारी असते. त्यांच्या वैवाहिक जीवनाकडे लोक डोळ्यात तेल घालून पहात असतात. तेव्हां हा नवा मार्ग जास्त सुखावह आहे हे लोकांना पटविण्यासाठी हे कित्येक प्रेमविवाहित वैवाहिक लौकिकाविषयी फार हळहळत असतात, आनंदाचे नेहमी प्रदर्शन करीत असतात मनमोकळेपणाचा देखावा करीत असतात, भांडणाला मतभेद म्हणतात. स्वैराचाराला आचार स्वातंत्र्य म्हणतात रुक्षपणाला बौद्धिक जीवन म्हणतात, लालसेला किंवा वासनेला नैसर्गिक गरज म्हणतात, आणि घटस्फोटाला सामाजिक सुधारणा म्हणतात ! !

सामान्य माणसापेक्षांहि या होशी सुधारकांना लोकमताची जास्त पर्वा वाटते व ते आपापल्या पद्धतीने लोकमताची मनधरणी करीत असतात. अरुंधतीने विवाहानिमित्त घडवून आणलेला समारंभ हा वरील मनधरणीचाच एक प्रकार होता.

आपला दिवाणखाना तिने अत्यंत आकर्षक तऱ्हेने सजविला होता. स्वतःहि सुंदर वेषभूषा केली होती.

डॉ. वसिष्ठ मात्र आपल्या ग्रंथराज्यांत गुंग होते. त्यांना त्या

समारंभाबद्दल अरुंधतीने त्या दिवशी रजिस्ट्रार ऑफिसमध्ये जाण्याच्या वेळीच सुचविले होते.

डॉ. वसिष्ट म्हणाले:—" तुम्हाला जरूर वाटत असेल तर जरूर करा. मला तसे वाटत नाहीं. "

" मग चार लोकांना कळणार कसे ? "

" काय ? "

" आपला विवाह झाला हे. "

" आपण विवाह झाल्याची नोटीस देऊ. "

" नोटीशीची तरी मग काय जरूर आहे. ? "

" ऐतिहासिक दृष्टया ती गोष्ट आवश्यक आहे. समाजाला आपले नवे नाते कळविणे जरूर आहे. "

" समाजाचा काय संबंध त्यात ? "

" प्रत्येक व्यक्तीने आपल्या जीवित क्रमातील कमजास्त फरक समाजास कळविले पाहिजेत. नाहीतर प्रत्येक व्यक्तीचा समाजाशी असलेला संबंध निरुपयोगी ठरेल. समाज या शब्दाला काहीं अर्थ राहणार नाहीं. "

" तुम्ही काय समाजासाठी विवाह केलात ? "

" होय. तसेहि म्हणा. अमकी एक व्यक्ति अमक्या एका व्यक्तीशी संबद्ध झाली आहे हे कळविण्यासाठी विवाह केला. "

" तुम्हाला स्वतःला नाहीं का त्यात कांहीं इच्छा ? "

" माझी इच्छा मी समाजास कळविण्यासाठी विवाह केला. नाहीं तर असं पहा. मी एकदम तुमच्या घरी किंवा तुम्ही माझ्या घरी येण्यास— राहू लागण्यास दुसरे कोणचे माध्यम होते ? वाटेल तो माणूस असा सहवास करू शकेल. वाटेल तितकी करू इच्छितील. व्यक्तींच्या आचरणांत अनिर्बंधपणा उत्पन्न होईल. "

" एखाद्या रिकाम्या जागीं बिऱ्हाड येऊन ती मोकळी जागा भरली जावी तसें वाटतें कां तुम्हांला विवाहाबद्दल ? "

" उपमा रुक्ष असली तरी बरोबर आहे. आपली मते आता एक-मेकानी भरून टाकली आहेत. आता आपली मते मोकळी राहिली नाहींत."

" यापेक्षा विवाहात काही अधिक नाही कां ? "

" काय आहे सांगा ना ? शारीरिक सहवास आहे. इच्छा आहेत, वासना आहेत, मोह आहेत परंतु ते सगळे विवाहात गृहित धरले आहे. विवाह जाहीर करण्यात सगळे काही जाहीर होते. "

" परंतु तुम्ही तर कायदेशीररीत्या एका स्त्रीबरोबर एका घरांत राहण्याचा हक्क मिळविण्यापलीकडे काही केले नाहीत. त्या हक्काची तुम्हांला गरज किंवा तळमळ नव्हती का ? "

" तळमळ नव्हती ग्यास. मला त्यात तळमळण्यासारखे काही वाटत नाही. सगळे क्षणभंगूर आहे ते. ते क्षण मी अनुभवले आहेत आणि एका क्षणात ते अनुभव बुडबुड्यासारखे वाढत वाढत शेवटीं फुटतात हेंहि मी अनुभवले आहे. उघड उघड एका क्षणाइतके जीवित असलेल्या अनुभवासाठी मी तळमळत नाही. मी त्या क्षणाच्या धरपकडीकडे शांतपणे पाहू शकतो. "

" आजच्या समारंभाकडे निदान शांतपणे पाहण्याची तरी तयारी आहे ना तुमची ? "

" मी त्याबद्दल कधीच मनाई केली नाही तुम्हांला. "

" मी विवाहाच्या निमित्ताने मोठी मेजवानी द्यावयाचे ठरविले आहे."

" जरूर. जरूर. माझ्या परवानगीची उणीव तुम्हाला भासण्याचे कारणच नाही. तशी उणीव भासली तर तुमची इच्छा पक्की नाही. निश्चित नाहीं. त्यांत कांहीं तरी व्यंग असल्याची रुखरुख तुमच्यांत आहे असा त्याचा अर्थ होईल. मी नसलो तर तुम्ही जितका सारासार विचार केला असतां, जें निश्चित ठरविलें असतें तें ठरवा. ते करा. आपण दोघांनीं हें ठरविले पाहिजे कीं, आपल्या इच्छेच्या योग्यायोग्यतेचे समर्थन आपले आपल्याला सिद्ध करतां आले पाहिजे. "

अरुधतीने या 'शाकरमाऱ्यावरून' एवढेच ओळखले कीं, विवाहाच्या दिवशीं मोठी मेजवानी घडवून आणावयाची.

ती मेजवानी घेण्यासाठी लोक येण्याची वेळ झाली होती. अत्यंत प्रफुल्ल मनानें अरुधती मुद्दाम सजविलेल्या दिवाणखान्यात गात गात हिंडत होती.

आपल्या मनातल्या कल्पना व्यक्त करण्यासाठी ती तळमळत होती. परतु त्यासाठीं तिला जो दुजोरा, जे प्रोत्साहन पाहिजे होतें ते डॉ. वसिष्ठा-कडून मिळण्याची आशा नव्हती. पुष्कळशा गोष्टी नेहमीच्या बोलण्यानें व्यक्त करता येत नाहीत. त्या मग कोणच्या तरी पदाचा आश्रय घेऊन मनुष्य व्यक्त करतो. गाणे हे अव्यक्त उत्कट भावना व्यक्त करण्याचें एक अप्रत्यक्ष माध्यम आहे. गाण्यात दुसरी एक सोय असते. गाण्याचा विषय पुढे करून गाणाऱ्यास आपल्या भावना व्यक्त करण्याचे सुद्धां समाधान मिळविता येते. गाण्याच्या पाघरुणाखाली गाणारा जगाशीं लपडाव खेळत असतो. उदा० त्या मेजवानीच्या आरभी मडळी येण्याच्यापूर्वी अरुधती जे गाणे गात होती तेच पहाना ! किती ओत-प्रोत शृगार भरला होता त्यात ! या माझ्या मनातल्या भावना आहेत असे अरुधती स्पष्ट साग शकली असती का ? परतु तसे खरेच नसते तर त्या प्रसगी नेमके तेच गाणे ती गात होती याचेंहि तिला कारण देता आले नसते.

ती ताना घेत कोकिळेसारखे सूर काढीत गात होती; त्यावेळीं डॉ. वसिष्ठ तेथे बसलेच होते. परतु त्याच्या कानावर आदळणारे शृगारिक गाण्याचे सूर त्याच्या मनापर्यंत पोहोचलेच नाहीत.

अरुधती गाणे गात होती. त्याचवेळी निमत्रित मडळी आलीं. झेडू. मारुतराव हे त्यातले पहिले. त्यांनीं हिअर हिअर करीत टाळ्या वाज-वल्या. तेव्हां अरुधतीने मागे वळून पाहिले.

अरुधतीचे त्यावेळचे रूप पाहिल्यावर मारुतराव सर्दच झाला. त्याच्या अगावर रोमाच उभे राहिले. स्त्रीसहवासाचे विविध अनुभव

घेऊन जवळ जवळ बधिर झालेले त्याचे मन पुन्हा खडबडून जागे झालें. अरुधतीहि त्याची मनास्थिति लक्ष्यांत घेऊन त्याला आणखी बधिर करीत होती.

क्षणभर श्वास घेतल्यावर मारुतराव म्हणाला,

" सुदर ! किती पण सुदर ! "

" कोण ? गाणे की मी ? " अरुधतीने विचारले.

डॉ. वशिष्ठानी तेवढ्यात मागे वळून पाहिले—

मारुतराव त्याना उद्देशून म्हणाला—" सागा डॉक्टरसाहेब, तुम्हीच या प्रश्नांचे उत्तर ! "

" पण प्रश्न काय आहे ? "

" वा ! मी इतका वेळ गात होते हे माहित आहे का तुम्हाला ?"

" मी गाणं ऐकत होतो. पण तुम्हीच ते म्हणत असाल अशी कल्पना नव्हती मला. तुम्हाला गाता येते हे मला आजच कळले."

" पहा मारुतिराव, मी त्याची पत्नी आहे हे सुद्धा विसरतील ते."

" पण तुमच्याजवळ पावती आहे ना ! तुमचे पार्सल रजिस्टर झालेले आहे, तेव्हा काळजी करण्याचे कारण नाही "

"लग्नसबध हे सिद्ध करून दाखविण्याची वेळ आली तर तेथे पावत्या उपयोगी पडणार नाहीत. नाहीं तर ज्या कागदावर करार नोंदले जातात तो करार फाडल्या बरोबर लग्नसबधही बाद ठरले असते, परतु असे होत नाही. घटस्फोट घेताना बेबनावाची कारणे दाखवून तो सिद्ध करावा लागतो. नाही तर एखाद्या देशाचा नकाशा फाडून किंवा आपल्या देशाच्या नकाशावरील रंग दुसऱ्या देशावर फासून तो देश नामशेष केल्याचेहि श्रेय एखादा लेखणीबहाद्दर तो ताब्यात घेतल्याचें जाहीर करावयाचा. "

"डॉक्टर साहेब, आपल्या विवाहाच्या पहिल्या दिवशी तरी हे तत्वज्ञान कमी करा कीं ! " अरुधती म्हणाली.

"अहो, हेंच खरें तत्वज्ञान आहे. विवाह झाला म्हणजे काय झालें काय तो सुखाचा ठरला कीं, दुःखाचा ठरला यशस्वी झाला कीं, अयशस्वी झाला हे कांहींच सांगता येणार नाहीं. मग आनद कशा-बद्दल ? मेजवान्या कशाबद्दल ? परीक्षा पास झाल्यावर व झाली तर पेढे वाटावयाचे कीं, परीक्षेच्या मडपांत जातां जाताच वाटावयाचे ? आम्ही यालाच माया म्हणतो. खोटे आहे हें सगळे !"

" मेजवानीचे रुचकर पदार्थ सुद्धा मिथ्याच असतील मग ? तुम्हीहि मिथ्या, मीहि मिथ्या, आपला विवाहहि मिथ्या. मग खरे तरी काय ? "

"हे सगळे मिथ्या आहे हे ! "

हा वादविवाद तोडण्यासाठी झेड्. मारुतराव म्हणाले. " वाः ! काय जोडा जमवलाय पण मी ! वसिष्ट आणि अरुधती हीं नावे मोठी योग्य आहेत ह ? "

परतु मारुतरावच्या या विनोदावर कोणीहि हसले नाहीं. तोहि खजिल झाला. परतु तितक्यात आलेल्या सत्यवानाने त्याची सुटका केली.

सत्यवान् नवऱ्या मुलासारखा पोषाख करून नटून थटून आला होता. आपल्या चालू जीवनातील सगळी धूळ झाडून तो आपल्या पूर्व-जीवनात शिरत होता. आपण अरुधतीस भेटावयास आलो आहोत ही जाणीव त्याच्या प्रत्येक हालचालीत दिसत होती.

परतु सुरवातीलाच झेड्. मारुतरावने त्याचा विरस केला. त्याला बोलायचे होते अरुधतीशी ! पण मारुतरावच पुढे आले.

" काय सत्यवान् ! आज अगदी खुषीत दिसता ? "

" तस काही नाहीं. तुमच्यासारखीं माणसे नेहमीच सुखी असतात. आम्ही एखाद्या वेळी तर खरे. "

" कस काय बुवा ! मला हा खुषी–खुषींतला फरक कळला नाहीं."

" ससार नाहीं मागें. त्यामुळें सुखाचे सर्वसचारी झोन तिकिटच आहे जणूं तुमच्याजवळ. "

" अरे ! आम्ही तर ससारी माणसाबद्दल मत्सर बाळगतों. "

" स्वतःचे ब्रह्मचर्य आक्षेपार्ह ठरू नये म्हणून ? "

" काय आहे त्यात आक्षेपार्ह ? "

" लग्नाचें वय निघून गेले कीं, मग लोक टीका करू लागतात कीं, कांहीं तरी पाणी मुरत असल पाहिजे. म्हणून तर मोकळा राहिला. "

" पण ब्रम्हचाऱ्यांतहि पहिलवानासारख्या दोन जाती आहेत ना. एक हौशी व एक बनावट. "

" तुम्ही हौशी कीं बनावट ? "

" मला काय करायचे बनावट ब्रम्हचर्य राखून ? मला काय मुलींना तोटा आहे ? कां माझ्यांत काहीं व्यग आहे ? विवाह होऊ न शक-ल्यानें, अविवाहित राहिल्याने शेवटीं काही जण ब्रम्हचर्याचा सत्याग्रह पुकारतात. परतु मी हौशीने अविवाहित राहिलो आहे. "

" हो, नाहीं तर समाजात नवराबायकोच्या जोड्या कोण जमवणार ? "

" कांहीं म्हणा. कोणच्याहि गोष्टीची विटबना करून दाखविता येते. "

" आणि अत्यत भिकार गोष्टहि अमूल्य ठरविता येते. "

" अलबत् ! हे ज्याचा तो ठरावितो. "

" तुम्ही काय ठरविलें आहे ? "

" माझें काम स्तुत्य आहे. मी ते हौशीने घेतले आहे. "

" किती जोड्या जमवतां दररोज ? "

" त्याच असं आहे, लागण व्हावी लागते त्याला. "

" कशाची लागण ? ही काय साथ आहे, कीं काय ? "

" सांथच नाहींतर काय ? प्रेम ही सांथ आहे. सांथीचा रोग जसा कोणाला केव्हां होईल याचा नियम नसतो. तसेंच या रोगानें कोण केव्हां पछाडलें जाईल याचा नियम नसतो. मी साधारणतः असा पाळती-वर असतो. भोंवतालच्या तरुणवर्गाकडे बारीक नजर असते माझी. त्यांच्या हालचाली मी पहात असतों. त्यांचे उसासे ऐकत असतों.

आणि दमछाक झाल्यामुळे ते धापा टाकू लागले कीं, मी मग त्यांच्या मदतीला धावून जातों."

" आणि कलम बाधून टाकतो ! "

" हो, कलमाचेहि डोळे बाधावेच लागतात ना ? प्रेमाचे डोळे बाधले नाहीत तर मग ते प्रेम कसले ?

डॉ. वसिष्टाना एवढेच शेवटचे वाक्य ऐकू गेले. ते म्हणाले, " यालाच " माया " म्हणतात. ज्याचे डोळे बाधले आहेत तो मायापाशात अडकतो."

" आणि तेच तर आमचे काम. त्याच अस आहे, प्रेमाचा ऐन बहर असतो तोच लग्नाचा सभव जास्त असतो. कारण एकमेकांना असतील तसे पत्करण्याइतका आधळेपणा त्या बहरात असतो. "

" प्रेमाचा काळ आणि विवाहाचा सभव हीं परस्पर विरोधी आहेत काय ? " अरुधती म्हणाली.

· " होय. म्हणून मी प्रेमी जनाना नेहमी सागतों. की, प्रेम आहे तोच आणा शपथा घेऊन पक्के करून टाका. नाही तर मग प्रेमाला अडचण होते. ते रोप कुडींत थोडेसे जीव धरू लागल्याबरोबर वाफ्यांत लावले पाहिजे. नाहीं तर ते कुडी फोडू लागते. आधीच तीं मोठीं झालेलीं मने कांही का होईना ती एका जागी स्थिर राहतात हेंच नशीब ! प्रेम हे स्त्री पुरुषानी एकमेकासाठी विणलेले जाळें आहे. त्यात दोघेहि न कळत सापडत जातात. "

" बराच अभ्यास आहे तुमचा मानसशास्त्राचा " अरुधती म्हणाली.

" मोठी मजा आहे यांत. "

" इतका की, त्वतःचा विवाह विसरूनच गेलात तुम्ही " सत्यवान् म्हणाला.

" तुम्हाला तरी कोठे तुमच्या विवाहाची आठवण आहे ? "

" नाही कशी ? चांगली आठवण आहे. "

" मग आपल्या सौभाग्यवती सावित्रीबाईंना कसे विसरलांत ? "

" काय म्हणालात ? "

" सावित्रीबाई ! विसरलात वाटत बायकोच नाव ? बाकी तेंहि अगदी शक्य आहे. अहो, तुमचा धर्मविवाह झाला ना ? त्या पद्धतींत लग्न झाल्यावर नवराबायकोंनें एकमेकांचें नावसुद्धां घ्यावयाचें नाहीं असा दडक आहे. "

" तेच ठीक आहे, नाहीं तर एकमेकाच्या नावाने हाका मारावयाची वेळ यावयाची. " अरुंधती म्हणाली.

डॉ. वसिष्ठाना जणू काय पुन्हा एकदां आपण मडळीत बसल्याची आठवण झाली. " त्यांत मोठे तत्त्व आहे. अद्वैतत्त्व आहे त्यात. पति-पत्नी हीं एकरूप झाल्यावर कोण कोणास हाक मारणार ? "

" काय सत्यवान ? पटते का हे ? "

" ते कांहींका असेना ? तुम्हाला ही कुकवाची उठाठेव पाहिजे कशाला ? तुम्हाला माझ्या पत्नीचे नाव माहित असण्याचे कारण ? "

" कारण ? त्याचा व माझा विवाहसंस्थेशी सबध आहे. माझे कार्यक्षेत्र किती व्यापक आहे हे तुम्हाला ठाऊक नाही. कुमारी असली तर वरसंशोधनासाठीं, विधवा असली तरी पुनर्विवाहासाठी— "

" आणि सौ. असली तर घटस्फोटासाठी ? " अरुधती म्हणाली.

" हो अगदीच काही चुकला नाहीत तुम्ही. म्हणजे सारांश काय सर्व स्त्रियांची नांवे, गावे आम्हाला माहीत असले पाहिजेत. दाखले म्हणून उपयोगी पडतात नव्या गिऱ्हाइकाच्या वेळी "

" चिटणीशीचा बराच, उपयोग होतो तुम्हाला. लोकाच्या खाजगी जीवनात वावरण्याचा तुम्हांला जणू परवानाच मिळालेला दिसतो. "

" अहो ! घरातल्या उदरांना आणि घुशींना, झुरळांना नि ढेकणांना घरमालकाची परवानगी लागत नाहीं घरांत राहण्यासाठीं. तसें, कोणाच्याहि वैवाहिक जविनांत हे बिनदिक्कत वावरू शकतात ! राम नाहीं ना आला चिटणीस ? "

" छे ! चिटणीसाला राग असतां कामा नये. चिटणीस हा परमेश्वरासारखा आहे. त्याला इतरांच्या राग—लोभाची पर्वा नसते. काय मुनिराज खर आहे ना हें ! " अरुधतीच्या बोलण्याला आपण जुमानीत नाहीं हे दाखविण्यासाठीं मारुतराव मुद्दाम डॉ. वशिष्ठाना उद्देशून म्हणाला.

"खर आहे. हे पहा अगदीं याच पुस्तकात याच पानावर सांगितले आहे. आत्मा कसा आहे—"

वशिष्ट अगदीं वाचून दाखविण्याच्या पवित्र्यात बसले, परतु अरुधतीने अत्यत निष्ठुरपणे त्याचा तो बेत हाणून पाडण्यासाठीं जोरांत म्हटले—

"कसा हि असू द्या. सध्या आत्मा नसला तरी चालेल. आधीं फराळाला चला. मडळी येऊ लागलीं. फेकून द्या ते ब्रह्म आणि ह्या मायामय जगात या जरा वेळ ! "

परतु डॉ. वसिष्ठाना राग आला नाही. ते हसत हसत उठले आणि एका खुर्चीवर जाऊन बसले.

सर्वांचे खाणे पिणे सुरू झाले. सर्वांचे लक्ष आळीपाळीने अरुधती व वसिष्ट याच्याकडे होते. परतु सत्यवान् अरुधतीकडेच पहात होता. अरुधतीहि सत्यवानाशी बऱ्याच मनमोकळेपणाने बोलत होती. आणि त्याचा तो जिव्हाळा असह्य होऊन मारुतराव मध्येच तोड घालून त्यांचीं तोडें बंद करीत होता.

मारुतरावपेक्षा अरुधतीला सत्यवानाशीं बोलणे जास्त बरें वाटत होते. याचे कारण आपल्या विवाहाच्या सर्व पूर्वघटना माहित असणाऱ्या माणसापेक्षां त्या बाबतींत अगदी अभिज्ञ असा माणूस—सत्यवान् तिचे जास्त कौतुक करी. अरुधतीच्या अहभावाला तें जास्त सुखावह वाटत होते. डॉ. वशिष्ट हे त्या प्रसगीं अत्यत रुक्ष व नीरसपणानें वागत होते. हें समारंभाचें व आपल्या वैवाहिक जीवनाचें एक व्यंगच झालें व तें लोकांच्या लक्षांत आले, याचें अरुधतीस फार दुःख होत

होतें. लोकांनी अभिनदन करण्यासारखे काहीं त्यांना दिसले नाहीं, यामुळें ती नामोहरम झाली होती. अशा वेळीं केवळ आपल्यासाठीं आलेल्या अशा सत्यवानाशीं बोलणे तिला जास्त आनददायक वाटत होते.

सत्यवान् भोवतालचे सर्व जग विसरून गेल्यासारखा वागत होता. त्या दिवाणखान्यांत आपण व अरुधती एवढीं दोघेच जण आहोत असे त्यास वाटत होते आणि त्याच्या बोलण्याचालण्यात अरुधतीच्या सहवासाबद्दलची लाचारी स्पष्ट दिसत होती. जणू काय आपल्याला पार्टीसाठी बोलावण्यात तिने फार मोठा प्रसाद केला आहे असे त्याला वाटत होते.

आपली कारकुनी विसरण्यासाठी त्याने कॉलेजातील गप्पा काढल्या आणि जणू काय आपण अद्याप त्याच जगात आहोत असा भास आपल्या मनात उत्पन्न केला.

मडळी हळू हळू जाऊ लागली. अरुधती त्याना निरोप देत होती. आपल्याला मडळीबरोबर जाण्याची वेळ येऊ नये यासाठी सत्यवान् डॉ. वसिष्टाशीं मुद्दाम बोलत बसला. आणि एकीकडे, सर्व मडळी जातात कीं नाहीं हें पहात होता.

मारुतरावहि जरा वेळाने गेले. परतु जाताना सत्यवानास डिवचण्यासाठीं तो म्हणाला.—

" काय सत्यवान्? मुक्काम आहे वाटत इथच ? "

सत्यवानने गांगरत उत्तर दिले.—

" छेः ! डॉक्टरसाहेबांशीं जरा गप्पागोष्टी करून जाणार आहे. माझा व त्यांचा आवडता विषय एकच आहे. तुम्हांला समजावयाचा नाहीं तो आनद. "

"ठीक आहे. समजलों तुमचा आवडता विषय."

मारुतरावच्या बोलण्यांतली खोंच अरुधतीच्याहि लक्षांत आली.

सर्व मडळी गेल्यावर अरुंधती सत्यवानाच्या जवळच्या खुर्चीवर येऊन बसली.

डॉ. वसिष्ट, सत्यवान, व अरुधती कांहीं वेळ एकत्र बोलत बसली होतीं. डॉक्टराच्या निरनिराळ्या गमती अरुधती सांगत होती आणि डॉक्टरहि आपल्या स्वभावाच्या मानाने बरेच हसलेहि !

परतु त्यांना मग काहीं तरी एकदम आठवले असावे कीं, हसणें वगैरे पोरकटपणाचे लक्षण आहे. आभास आहे हा सुखाचा. ते उठले आणि आपल्या अभ्यासाच्या खोलीत जाऊन बसले.

त्या दिवाणखान्यातील एकांत सत्यवानास आता असह्य झाला. तेथे फक्त अरुधती व सत्यवान् एवढे दोघेच राहिले. मनावर काही तरी दडपण पडल्यासारखे सत्यवानास वाटू लागले. त्याला नीट बोलताहि येईना.

शेवटी तो जाऊ लागला.

अरुधती एकदम गभीर झाली. अगदीं हळू आवाजात ती म्हणाली " खरच निघालात ? "

" हो "

" येत जाल ना वारवार ? "

" जरूर "

" अच्छा. गुड ईव्हिनिंग "

अरुधतीने हस्तादोलनासाठी पुढे केलेल्या हाताकडेच सत्यवानाचे लक्ष होते. त्याला उत्तरादाखल ' गुड्इव्हिनिंग ' म्हणण्याचे सुद्धां भान राहिले नाहीं.

त्याने हात पुढे केला, तो थरथर कापू लागला. आणखी हात पुढे केला.

दोघे एकमेकाच्या डोळ्यांकडे पहात होतीं.

सत्यवानाचा हात शेवटीं अरुधतीच्या हातास लागला. अरुधतीने त्याचा हात दाबून हस्तांदोलन केले!

अरुंधतीनें, परस्त्रीनें, तरुणीनें केलेले हे दुसरे हस्तादोलन !

सत्यवान् कांहीं एक गुंगींतच घराकडे निघाला.

रस्त्यानें तो कांहीं तरी गुणगुणत होता.

नतर गाऊही लागला.

लोक हसतात हें त्याच्या लक्ष्यांतहि आलें नाहीं.

कित्येक वर्षे दडपून टाकलेल्या मनोवृत्ति एकदम उसळून त्याच्या मनांत थैमान घालू लागल्या !

आणि घराजवळ येऊ लागल्यावर त्याला नेहमीं जें औदासिन्य वाटे तें त्या दिवशीं वाटले नाहीं !

सत्यवानाची वाट पहात सावित्री बसून राहिली होती आणि स्वतःशीं निरनिराळीं गाणीं गुणगुणत होती.

सत्यवान् एकदम खोलींत आल्याबरोबर ती दचकून उभी राहिली.

तिच्या नजरेत भीति दिसत होती.

सत्यवानाच्या नजरेंत उन्माद दिसत होता.

त्याने एकदम पुढे जाऊन सावित्रीस दृढालिंगन दिलें. सावित्रीच्या ठिकाणीं त्याला अरुधती दिसू लागली.

सावित्रीला दरदरून घाम सुटला. सत्यवानाच्या मनस्थितीचें स्वरूप तिला अगम्य होतें.

सत्यवानाच्या मनस्थितीला तिला साथ देता येईना. सत्यवान् अगावरचे कपडेहि न काढतां कॉटवर जाऊन पडला. सावित्री त्याच्याकडे पहात म्हणाली—

" अस काय करता ? काय झाल मेजवानींत इतक बेहोष होण्यासारख ? "

" बेहोष ! डार्लिङ्ग ! "

" म्हणजे काय ? "

" म्हणजे काय ? काय सांगू तुला ? डार्लिंग म्हणजे तू ! "

" हो का ? पण मग मला समजेल असंच कां नाही बोलत ?

म्हणजे मला समजणार नाही अशा शब्दात हाक मारायची आणि मल कळल नाही की पुन्हा म्हणाल बाहेर हो नि बाहेर जा."

" पण तुला समजायलाच पाहिजे. खरच सावित्री तुला फक्त इंग्रजी येत असतें तर– ! वाः ! काय मजा आला आज."

"कशाचा ? इंग्रजीचा कीं जेवणाचा ? –

"इंग्रजी जेवणाचा ? माहीत आहे तुला इंग्रजी जेवण ?–"

" जेवणासारख जेवतातच ना ते जेवण ? फक्त नांव निराळं ना ? –"

" पण त्यांत तर मजा आहे. अग–हे पहा बायकोला म्हणे अग काय अग काय नि अहो काय ? नि शुक्–शुक् ! त्यापेक्षा डार्लिङ्ग अ हाक मारण किती सुदर आहे. भावना व्यक्त झाल्या पाहिजेत. कळल्य पाहिजेत. प्रेम दाखवले पाहिजे. पत्नीवर प्रेम असले तर ते व्यक्त कर ण्याची बंदी का ? आपली भाषा आपलीच मुस्कट दाबी करणार ? प ते लोक पहा; आपल्याला प्राणाहून प्रिय असलेल्या पत्नीला प्रेम व्यक्त होईल अशीच हाक मारतात."

" काय हाक मारतात ? "

" मी तुला हाक मारली तशी–तीच ! म्हण म्हण ! "

" तुम्ही मला म्हणतांना जे म्हणता तेच मी तुम्हाला म्हणतां म्हणायच का ?

" हो पतिपत्नींत भेद नाहीं, डार्लिङ्ग ' –

" डार्लिङ्ग ! ध्यः ध्यः म्हणे डार्लिङ्ग ! डा ऽ लिंङ्ग ! इश्श ! मल नाहीं आवडत. तुम्ही मला प्रिय आहात हें बोलून कशाला दाख वायला पाहिजे? "

" तुला कळत नाहीं कांहीं. मनातल्या भावना व्यक्त केल्या नाही तर मग त्या असून नसून सारख्याच ! माणसाला तोड असून उपयो काय मग ? खुणेने होतेच सगळ. सगळ शरीर बोलल पाहिजे. "

" म्हणजे काय ? शरीराला वाचा फुटणार ? "

" होय. हाताने खुणा करताना आपण भावनाच व्यक्त करतो. नाहीं कां ? प्रिय माणूस पाहिल्याबरोबर डोळे बोलू लागतात ? प्रिय माणसाच्या भेटीच्या वेळीं सुंदर पोषाख करतो ना आपण ? मग पोषाखानें बोलण्याचेंच काम नाही का होत ? तुला मी अशी बोलकी करणार आहे. इंग्रजी शिकल्याखेरीज हा बोलकेपणा येत नाहीं. बरं डार्लिङ्ग ? —"

सावित्री मुकाट्यानें बसली होती. तिला हे सगळेच नवे होते. सत्यवान् तिच्याशी इतके शब्द एका दिवसभरातसुद्धा बोलत नव्हता.

परंतु सत्यवानाने आपला संसार बदलून टाकावयाचा निश्चय केला होता. अरुंधतीच्या सहवासाचे हे प्रतिध्वनी होते. सावित्रीला सर्वथैव अपरिचित असे हावभाव तो करू लागला. प्रेम व्यक्त करण्याची त्याचीं शरीरनिष्ठा तऱ्हा पाहून सावित्री गांगरली. परंतु तिला विरोध करण्याचे धैर्य झाले नाहीं. पति–पत्नीचे ते हावभाव असभ्यपणाचे असतात असे तिचें ज्ञान तिला सांगत होतें.

विषय बदलण्यासाठीं तिने सत्यवानास विचारले—

" कोणाकडे होती मेजवानी ? "

" ज्यांचे लग्न झाल त्यांच्याकडे "

" पण ते कोण ? तेच तर विचारतें. "

" डॉ. वसिष्ट आणि अरुंधती "

" कोण कोठचे हे ? आपल्याकडे तर कधी आलेहि नाहीत ? "

" एम्. ए. पीएच्. डी. पुरुष किंवा एम्. ए. बी. टी. स्त्री कशाला येतील या घरांत ? "

" मग तुमची व त्याची ओळख कुठची ? "

" आम्ही कॉलेजांत बरोबर होतो. फार हुशार आहेत. दोघेजण."

" हुशार असतील पण—"

" काय ? पण काय ? बोल ना ? पण काय ? "

" रागावूं नका ह. रागावणार नसाल तर सांगते. मला क करायच बोलून म्हणा ! "

" सागतेस की, नाही ? "

" व्यवहारात बेताबाताचेच दिसतात. "

" ओहो ! तू त्याची पारख करणार ? काय चुकला त्या व्यवहार ? "

" समजा तुम्ही त्याना उद्या चहाला बोलावलत तर एकट्य बोलवाल की, दोघाना ? मला तस काही वाटल नाही हो. मी आ हि नसते. कारण त्या एवढ्या मोठ्या— ? "

" तूहि होशील मोठी, म्हणजे लोक तुलाही बोलावतील "

" आता फक्त वयानेच मोठी होण शक्य आहे. आणि तेहि ज बाचले तर "

" का ? ज्ञानान का नाही होणार ? तुला मी इंग्रजी शिकव आहे. तू सगळे हे गबाळेपण सोडून दिले पाहिजेस. जरा नेटकी रहात जा; अगदी अरुंधतीसारखी दिसशील. "

सावित्रीला अरुंधतीचा सत्यवानाने केलेला उल्लेख आवडला ना इतकेच नव्हे ती दचकली तो ऐकून ! याना अरुंधतीचे वेड लागले अ हे तिनेंहि चाणाक्षपणे ओळखले, पण ते बोलणार कसे ?

तिचे मन भटकू लागले. तरी ती, सत्यवानाच्या बरोबर बोल होती.

" अरुधती सारख्यांची कशाला मला उपमा ! मी आप माझ्यासारखी बरी आहे. "

" नो ! नो ! मी सांगेन तस वागल पाहिजे. अशी बावरू नको येथें बैस. "

" सासूबाईना आवडेल हें डार्लिङ्ग प्रकरण ? "

" तिला काय कळतय डार्लिङ्ग म्हणजे काय ते ? "

" अन् हें अस् बसण, बोलण ? "

" नाहीं आवडल तर खुशाल ओरडू दे. तिला आमच्यामध्ये पडायचं मुळींच कारण नाहीं. "

सत्यवानाने बोलतां बोलतां सिगारेट पेटवली.

" अस्स ? आता हे येथपर्यंत आल वाटत ? इतक्या दिवस-- ?

" गेले ते दिवस आता ! मी 'एन्जॉय' करायच ठरवल आहे. "

" म्हणजे काय करणार आहांत ? "

" हो. तुला इंग्रजी येत नाहीं नाही का ? करतो--त्याचीहि व्यवस्था करतो. अगदी अप-टु-डेट संसार झाला पाहिजे. "

" त्याला ' हे ' आवश्यक आहे वाटत ? "

" अलबत् ! तुलासुद्धा सिगारेट ओढावी लागेल. नाहीं; तुला आत्ताच ओढायला लावतो. ह-- चल तुझा सगळा जुनाटपणा जाळून टाकतो सिगारेटने "

सत्यवान् खरोखरच सावित्रीला सिगारेट ओढण्याची बळजबरी करूं लागला. दार लावून टाकून त्याने तिच्या तोंडात सिगारेट कोंबली ! त्यावेळीं त्याच्या मनात बरीचशी थट्टा आणि थोडीशी चीडही होती ! आयुष्याची चौकट बदलली पाहिजे अशी त्याला सारखी तळमळ वाटत होती. परतु ते फार कठीण होते म्हणून तो चिडून काहीं तरी करीत होता. निदान आहे तो ससार तरी ' रोमॅंटिक ' करावा असे त्याच्या डोक्यात वेड शिरले.

सावित्री जवळ जवळ ओरडण्याच्या बेतात आली. इतक्यात तिला ठसका लागला आणि तिची प्रेमळ सासू खाली ग्वडबडून जागी झाली. आणि सूनबाईला एकदम खोकल्याची ढास कशाने आली अशी तिला काळजी वाटून तिने, " सून बाई. ए सून बाई. सावित्री ऽ अ ऽ " अशा हाका मारावयास सुरवात केली.

सत्यवान् जास्तच सतापला. आपल्या वैवाहिक जीवनांत मुबलक एकांत सुद्धां मिळत नाहीं हे सतापाचे ताजे कारण. आईचा त्याला सताप आला. सावित्रीचा सताप आला.

तो खोलींतूनच ओरडला. " काय आई ! काय पाहिजे ? "

" मला काही नकोरे ! तिला ढास लागली का ? थोडी खडीसाखर धर म्हणाव तोडात. "

" काहीं काळजी करू नकोस. नीज स्वस्थ ! "

आणि मग तो सावित्रीस म्हणाला—" खडे घालतो साखरेच्या ऐवजीं ! तुला काहीं हौस, उत्साह असा नाहीच. नुसती नावानें सावित्री नाहीस. अगदीं खरीखुरी सावित्री आहेस. सावित्रीचा अवतार आहेस. मी तर नांवापुरता सत्यवान् आहे. भोवतालच्या लोकाचे ससार पाहूनसुद्धा तुला काही स्फूर्ति होत नाही ? घरांतल्या माणसांच्या आवडी निवडी कळत नाहीत ? त्यापेक्षा एखाद्या भटजीचा ससार का नाही सजवलास? ते काही चालायचे नाही याच्यापुढे ! मी सासू वगैरे काही जुमानणार नाही. चार सुशिक्षित बायकासारख तू राहिल पाहिजेस. तुला मी आता स्वतःच हाताशी धरणार आहे "

" पण मी कधी तरी एका शब्दान तरी नाही म्हटल आहे का ? मी मुळी माझा हात तुमच्या हातात दिलाच आहे. तुम्ही न्याल तिथे येईन. जाल तिकडे येईन "

" वा ! किती हुशार आहेस. तुला आता खूप शिकवतो नि मग अरुधतीला दाखवतो की— "

" आपणच पाहू कीं ! "

---

# कायाकल्पाचा प्रयोग !

## प्रकरण ८ वें.

सत्यवान् त्याच मनोराज्यात गुग झाला. सावित्रीतून अरुंधती बाहेर येत आहे असे दृश्य त्याच्या अंतःचक्षुसमोर उभे राहिले ! विद्वत्ता आणि फॅशन यातील अंतर जाणण्याइतका तो विद्वान नव्हता. सावित्री अरूंधतीसारखी ' दिसली ' तरी त्याचे आधुनिक मन त्याच्यावर खूष होतें. फॅशनेबल माणसानाच जग सुशिक्षित म्हणते. विशेषतः स्त्रियाच्या बाबतीत तर हे जास्त खरे आहे. कारण समाजाच्या सर्व विभागांत कार्यकर्त्या ह्मणून हिंडणाऱ्या, सभा समेलनास शोभा आणणाऱ्या स्त्रिया, आपल्या केवळ विशिष्ट राहणीने भोवतालीं आदर उत्पन्न करू शकतात. स्त्रियाच्या बाह्य सौंदर्याचा हा बाजारभाव प्रत्यक्षपणे व्यवहारात पदोपदी सिद्ध झाला आहे. त्यामुळे अलीकडे पुष्कळ संस्थांतून स्त्री—चिटणीस निवडण्याची जी पद्धति दिसून येते त्यात वरील विचार बराच प्रबल असतो. संस्थेसाठी मदत मिळविताना विद्वान् पुरूषापेक्षा दिखाऊ मुलीकडून जास्त कार्य होतं. बहुजनसमाजात कार्य आणि कार्यकर्ते याची लायकी कळण्याइतके फार थोडे लोक असतात.

एखाद्या सार्वजनिक समारंभातहि हाच अनुभव येतो. जरा नीटनेटक्या राहणीच्या स्त्रीस बरोबर घेऊन आलेल्या गृहस्थास तेथे ताबडतोब जागा वगैरे सोयी मिळतात. फॅशनलाच लोक सौंदर्य समजत असल्यामुळे लोकावर वजन मारणे फार सोपे झाले आहे.

आणि सत्यवानला तरी आपल्या पत्नीच्या विद्वत्तेशीं काय करावयाचें होते ? त्याच्या स्वतःच्या जीवनाचा विद्वत्तेशीं काय आणि कितीसा संबंध होता ? अरुंधती जर एक ओबडधोबड स्त्री असती तर ? त्याला कांहींहि वाटलें नसतें. तेव्हां तो आपल्या मनाची फक्त समजूत करीत होता कीं, मी विद्वत्तेसाठीं तिला मानतो. सौंदर्यासाठीं नाहीं. कारण त्याला माहीत होतें कीं, तीं दोन्ही त्या ठिकाणीं मिसळलेलीं आहेत. एकाबरोबर

दुसरे येतेंच. ‘ तसे ’ सौंदर्य आपल्या घरातहि उभे करता येईल असें त्याला वाटू लागलें. सावित्रीवर कायाकल्पाचा प्रयोग करण्याचें त्याने ठरविले.

सत्यवानाच्या वृत्तीत अरुधतीमुळे अतिशय बदल घडून आला आहे हे सावित्रीने ताडले होते. तिच्या जगात अशी बरींच उदाहरणे तिला माहीत होती . फॅशनेबल स्त्रीच्या नादीं लागून , आपल्या सेवानिष्ठ गृहिणींना विसरलेले व त्याना लाथाडणारे लोक तिला ऐकू आले होते. कित्येक तरुण आपला विवाह आईबापानी जुळविला आहे एवढ्याच कल्पनेने आपल्या पत्नीवर असतुष्ट असतात . आणि ते ज्याच्यावर सतुष्ट असतात त्याच्यात व त्याच्या पत्नींत कित्येक प्रसगी तसा काहीहि फरक नसतो . असलाच फरक तर एवढाच की, त्या त्याच्या पत्नी नसतात व त्याची पत्नि ही त्याची पत्नि असते. कित्येकाच्या जीवनांत तर विवाहानतर प्रेमसबध सुरू होतात आणि त्याचेहि कोडकौतुक असेंच होते कीं , त्यांचा प्रेमभग झाला आहे!

पुरुषाची ही वृत्ति वाटते तितकी आधुनिक नाहीं. त्यांत आधुनिक काहीं असलेच तर या वृत्तीचे आधुनिकता हे नाव एवढेच. त्यांतलें खरे आधुनिकत्व स्त्रियांच्या बाबतीत आहे. अरुधतीसारख्या कित्येक स्त्रिया आधुनिकतेच्या नावाखाली सुशिक्षिताच्या घरात प्रवेश मिळवितात. त्याच्यात वैवाहिक असतोष जागृत करतात व आपण तेथें हळू हळू स्थिर होऊ लागतात. एखाद्या ससर्गजन्य रोगाची साथ आल्याप्रमाणे त्या ससारातले सुख झपाटले जाते . त्या ससारातला नायक त्या आपल्या मैत्रिणीसाठी झुरू लागतो ! आणि आपल्या पत्नीवर केवळ ती पत्नि आहे म्हणूनच नाखूष असतो. या सगळ्या ‘सभ्य’ व्यवहाराचे नांव वासनाविलास या पलीकडे काही नाही. प्रेम हा शब्द वासना याच अर्थी बहुतेक वेळा वापरला जातो. आणि वासना ही नेहमीं स्थलांतरप्रिय, गतिप्रिय, नाविन्यप्रिय, दुर्लभताप्रिय असते !

त्या मैत्रिणी व पत्नि या दोन वर्गात एक प्रकारचे वर्गयुद्ध सुरु असते. गृहिणींना गृहिणीपदावरून पदच्युत करण्याच्या निश्चयानें या मैत्रिणी आपल्या मित्राच्या घरांत संचार करू लागतात.

अरुंधतीसारख्या स्त्रिया ही या मैत्रिणींच्या जातीतली एक पोटजात आहे. त्यांना आपल्या वैवाहिक जीवनाबद्दल झाली तर निष्ठा उत्पन्न होते. परंतु निष्ठा, एकनिष्ठा हा त्यांचा स्थायीभाव नसतो. व्यवहार म्हणून एक सामाजिक संरक्षण, सभ्यतेचे पांघरुण म्हणून त्या कोणातरी समाजप्रसिद्ध पुरुषाशीं विवाह करतात. आणि मग आपली मित्रमंडळी जमवू लागतात. बहुविधतेची एक अत्यंत छिणकस आवड त्यांच्यांत असते. समाजातील मान्यवर पुरुषाशीं विवाह केल्यामुळे त्यांना भरपूर आचारस्वातंत्र्य मिळते. कारण त्यांच्या स्वातंत्र्याला बाध आणण्याचे त्या प्रसिद्धामध्ये धैर्य नसते, किंवा मारून मुटकून टिकविलेल्या निष्ठेची त्यांना पर्वा नसते. त्यामुळें आपल्या गृहिणी 'मित्रमंडळी' जमवून हिंडू फिरू लागल्या तरी ते त्याचा अर्थ एवढाच समजतात की, आपणास आपल्या गृहिणीची एकनिष्ठा मिळाली नाही! ती मागून, मारामारी करून मिळत नसते!

या नावापुरत्या गृहिणी असलेल्या मैत्रिणी हा अस्सल गृहिणीच्या जीवनांत मोठा धोकाच असतो. तसला धोका सावित्रीच्या जीवनांत उत्पन्न होऊं लागला होता. आपण अरुंधतीसारखे आपलं जीवन केलं नाहीं तर सत्यवानाचे मन घरांतून उडून जाणार, हा धोका तिला कळ त्याबरोबर तिने आपलं जीवन सत्यवानाच्या या नव्या लहरीप्रमाणे सजविण्याची तयारी केली. तिचं सगळं जीवनच सत्यवानाच्या इच्छेप्रमाणें चाललें होतं. सत्यवानाने तिच्यावर सक्ति करण्याचा कधीं प्रसंगच ओढवला नाहीं कारण स्वतःच्या काही इच्छाच नसल्यानं तिला सगळें जीवन सत्यवानाच्या इच्छेतूनच मिळत असे.

परंतु आपल्या जीवनक्रमांत फरक करणे जरुर झाले आहे. हे तिला कळलें तरी तो फरक कसा घडवुन आणावयाचा हें कळणें तिच्या आटोक्याबाहेर होतं. स्वतःचे 'सावित्री' रूप पहात जी आरशापुढे उभी राहिली आणि त्या सौभाग्यवती सावित्रीतून "मिसेस् सत्यवान" कशी तयार करावयाची "डार्लिङ्ग सावित्री" कशी उत्पन्न करावयाची याची योजना ती मनाशी तयार करीत होती.

# ज्ञानाचे दलाल

## प्रकरण ९ वें.

थोडे तरी इंग्रजी शिकले पाहिजे असा सावित्रीनें निश्चय केला. शाळेत जाणे तर शक्यच नव्हते. तेव्हा शाळेत न जाता शिक्षणाचें पुण्य देणाऱ्या सोई ती पाहू लागली. राहणींतहि फरक केला पाहिजे हे तिला सत्यवानाने बजावले होते. आपल्या पत्नीचे बाह्य स्वरूप तावडतोब बदलवण्याचा सत्यवानानें निश्चय केला होता. त्यानें तिला त्याबाबतींत अगदी आदर्शपाठ द्यावयास सुरवात केली होती.

त्या एका ध्यासाने त्याच्या ठिकाणीं एक प्रकारची विकृतिच उत्पन्न झाली होती. तो आपले दारिद्य, आपली नोकरी सर्व कांहीं विसरला. तो दररोज सावित्रीसाठीं काहीं कांहीं विंचित्र वस्तु फॅशन या नावाखालीं घेऊन येई. तिला तो निरनिराळ्या प्रकारांनीं सजवून पाही. आणि त्या फॅशनच्या जुलमाखालीं सावित्रीचा जीव रडकुडीस आला होता.

दुसरें असे की, कितीहि व कशीहि नटवली, सजवली तरी सावित्रीच्या मूळ ठेवणीत फरक पडेना. आणि मग आपले पत्नीचें आधुनिकीकरण करण्याच्या प्रयत्नात अपयश आल्यानें सत्यवान् जास्तच चिडे. आणि सावित्रींतून अरुंधती निघत नाही हे कळल्यावर तो तडक अरुंधतीकडे जाऊन बसे. डॉ. वसिष्टाच्या प्राथिक जीवनाला अरुंधती लवकरच कंटाळली व तिने मित्र जमविण्यास सुरवात केली. त्यांत सत्यवान् हा एक होता.

सावित्रीचे प्रामाणिकपणे प्रयत्न चालू होते आणि ती आपल्या भोंवतालचे जग पाहू लागली त्यावेळी पुष्कळ गृहिणी आपल्या ' मालकांच्या ' मर्जीखातर काहीं तरी शिकण्यासाठी धडपड करीत असवाव, हे तिला कळलें. आपल्या पत्नींनीं घराबाहेर पडून काहीं तरी आधुनिक करावें अशी त्यांची इच्छा असे. पत्नींनीं एकप्रकारें अशा रीतीनें घराबाहेर

काढल्यामुळें कोणी विणकामाच्या वर्गाला जात, तर कोणी हार्मोनि-यमच्या वर्गाला जात. कोणी हिंदी शिकत तर कोणी शिवण शिकत. कोणी दिलरुब्यावर गज फिरवावयास सुरुवात केली होती, तर कोणी फिडलच्या तारातून मजूळ सूर काढण्याची यातायात चालवली होती.

असंतुष्ट पतींची ही गरज कांहीं धंदेवाईकांनीं लक्ष्यात घेऊन गृहि-णीसाठीं वर्ग काढले होते. कोणी ३ रु. त ३ वाद्यांचें शिक्षण देणारे तर कोणी ५ रु. त सर्व ललितकलाचे शिक्षण देण्याची प्रतिज्ञा करून बसलेले. ज्ञानाच्या या दलालांनीं बेडरपणानें आपल्या दारावरील पाट्यावर मोठमोठ्या अक्षरात बड्या थापा रंगविल्या होत्या. कांहींनीं तर आपल्या पत्नीला तयार करून एकाच माडींत सकाळ, संध्याकाळ पुरुषांसाठीं व दुपारीं स्त्रियासाठीं स्पेशल क्लासेस काढले होते. कांहीं आपल्या वर्गाला विद्यालय म्हणत तर कांहीं त्याला आश्रम म्हणत. या संस्थेत दर वर्षी नवीन नावें नोंदवलीं जात. परंतु तरी एकूण संख्या कधी वाढत नसे, कारण फार थोडीं नावें टिकून रहात असत. आपल्या पत्नींमध्ये ललितकलाचा कितपत प्रवेश झाला आहे हें पाहण्यासाठीं त्यांचे पति घरीं अधीरतेनें तपास करू लागत आणि त्यांची तीव्र निराशा होई. ते चिडून पत्नीचा क्लास बंद करून टाकीत !

परंतु याच दंगलीत काही वर्ग मात्र चालत असत. त्या वर्गांत दोन तीन वर्गांचें मिश्रण केलेले असे. शिवणकला आणि गायन ; सुतार काम आणि गीता क्लास ; फोटोग्राफी आणि तंतुवाद्यवादन, अशा विषयाच्या जोड्या जमवून शिक्षण देणारे वर्ग बरेच टिकाव धरीत. या खाजगी वर्गांनीं ज्ञानी माणसांचा भाव उतरविण्याचा जणूं चंग बांधला होता. आहे काय असे विद्यार्जनांत ! आम्ही तें झटपट देऊं शकतों, असें ते उत्साह देत.

या कलात्मक शिक्षणांत हळूहळू शालेय अभ्यासाचाहि समावेश

होऊं लागला. २ विषय शिकणारास तबला-वादन-कला मोफत व ३ विषय शिकणारास हार्मोनियमवर ७ पदे बसवून दिली जातील. असा पुस्तकी ज्ञान व ललितकलाचाहि संयोग काही शहाण्यांनीं घातला.

आणि दामू मास्तरने तर सर्वांवर ताण केली होती. सत्यवानाचा जो शाळा सोबती ! परंतु सत्यवान् भराभर पुढे जाऊन मग थाबला तर दामू मास्तर मध्येच थाबला. आणि शिक्षण पुरे झाले नाहीं याबद्दल खेद न बाळगता तो अत्यंत आनंदाने जगत होता. असेल तेथें व मिळेल त्यांत सुखी व्हावयाचें हा दामू मास्तराचा बाणा होता. त्याना कधीं दुःखी, चिंताग्रस्त असे कोणी पाहिले नाहीं.

एखाद्या नेपोलियन किंवा सीझरसारखी त्याची धरपड चालू असे. यश मात्र त्याला कोठेच भेटले नाहीं. संकटाचा सूर्य नेहमी तोंडावर असल्यानें यशाची सावली नेहमीं त्यच्याकडे तोंड फिरवून बसलेली !. परंतु दामूमास्तर कधी मटकन् खाली बसला नाही.

त्याचा स्वभाव हीच त्याची मोठी संपत्ति होती. तो नेहमी म्हणे, "माणुसकी हेच आपल भांडवल आहे. आणि हे भांडवल बुडत नाहीं. याच्यावर इतरांच्या माणुसकीच्या रूपाने सारखे व्याज मिळत असते. त्या व्याजावर मी जगत आहे. माझ्या पोटाचा विस्तार लहान असला तरी खोली फार आहे. श्रीमंताचीं पोटे समुद्रासारखी असतात नि:गरीबांची खोल आडासारखीं असतात. कधीं भरावयाचीं नाहींतच, नेहमीं रिकामी नि खोल गेलेलीं ती ! उलट समुद्राला आहे तसं कांहीं! श्रीमंतांचीं पोटें नेहमी तुडुंब असतात, इतकंच नाहीं तर त्यांना आणखी मेदोवृद्धीची भरती येत असते."

एकदा दामू मास्तरांनीं एक जाहिरात वाचली. पोट साफ ठेवण्याबद्दल त्यांत उपदेश केला होता आणि आरंभीं सांगितलें होतें— "नेपोलियन म्हणत असे की सैन्यं पोटावर चालतात."

दामू मास्तरने त्याच्यावर शकल लढवली. "तसे नाहीं. गरीब पाठीवर चालतात."

" कसे काय ? "

" कारण आणि म्हणून श्रीमत गरीबाच्या पोटावर चालतात ना ? श्रीमतांनी चालून चालून तर गरीबांच्या पोटाला खळगा पडलेला असतो आणि पाऊलवाटेप्रमाणे घड्या पडलेल्या असतात. खरं म्हणजे गरीब श्रीमतांना पोटावर वाहून नेत असतात. श्रीमताना चालता येत नाही. "

दामूमास्तरने पोटासाठीं अनेक व्यवसाय केले. आणि ते सगळे जरी अयशस्वी झाले तरी ते सोडताना तो त्या व्यवसायानिमित्त भेट-लेलीं माणसें नेहमी जोडीत असे. त्यामुळे मागच्या व्यवसायातील माणसें हे त्याचे पुढच्या व्यवसायातील बाधलेले गिऱ्हाईक आणि त्यांचें प्रेम हे भाडवल.

सत्यवान् व दामू याची अतिशय मैत्री, तरी भेट मात्र दररोज होत नसे. कारण सत्यवान् हा एक बडा ऑफीसर झाला आहे अशी दामूची कल्पना नव्हे खात्रीच होती. आणि आपल्या मित्राची इभ्रत आपल्या दारिद्र्यानें कमी होऊ नये अशा समजुतीने सत्यवानास जाहीर रीतीने क्वचित् भेटे. परतु त्याच्या घरीं मात्र नेहमी जाऊन स्वयपाकघरात गप्पा मारीत बसे. आणि पुष्कळ वेळा तेथेच फराळाच्या मार्गाने दामू मास्तर जेवणाचें काम उरकून टाकी आणि मग घरी आल्यावर आपल्या अर्धांगीशी त्याचे एकाद तरी भांडण होई. परतु दामू मास्तरपुढे भांडण म्हणजे पालीपुढें विंचू !

त्याची पत्नि आणि सावित्री मैत्रिणी झाल्या होत्या. दामू मास्तरांची एका एका पराक्रमक्षेत्रांतील कामगिरी सांगणें व ऐकणे ही त्या मैत्रिणींची करमणूक !

सत्यवानाच्या मनांत फॅशनेबल राहणीचे वेड आल्यापासून सावित्री जरा उदासीन दिसत होती.

एक दिवस तीं आपले दररोजचे घरकाम करीत होती. आंगणात ती उभी होती. तोच तिचें तेथल्या पोपटाकडे लक्ष गेले आणि तिने घरांत जाऊन भिजलेली डाळ नि पेरूच्या फोडी आणल्या. तें खाद्य हातात पाहिल्या बरोबर पोपट नाचू बागडू लागला. आणि आपले सर्व वाक्सामर्थ्य एकवटून २।४ शब्द वारवार उच्चारू लागला.

सावित्रीस वाटले, "आपणहि या पोपटासारखेच नाही का? जे काय थोड फार ज्ञान आहे, सामर्थ्य आहे ते आपल्या मालकासाठीं खर्च करावयाचे नि त्याचा मोबदला—थोडीशी डाळ नि एकादी पेरूची फोड!

——आणि आता माझ्या मालकांची लहर फिरली आहे. त्यावर ते संतुष्ट नाहींत. पोपटाने सिंहाची गर्जना करावी असे त्याचं फर्मान आहे. पोपट, पोपट! तू शिकलास का रे इंग्रजी? समजा तुला उद्या अशी अट घातली कीं, तू गरुडासारखा रहात जा आणि सिंहासारखा ओरडत जा. नाहीं तर—नाहींतर तुला हा पिंजरा एकदम खाली करावा लागेल. तर काय करशील तू ? "

पोपटाला हे कळले कीं नाहीं कोणास ठाऊक ! तो सावित्रीच्या तोंडाकडे पहातच राहिला आणि नतर त्याने आपली चोच गजांतून बाहेर काढली. गज कडकडून चावावयास सुरवात केली.

सावित्री पुढे न बोलताच पिंजऱ्याजवळ उभी राहिली.

इतक्यात तिला हाक ऐकू आली.

" काऽकू "

सावित्रीनें दचकून पाहिले. शेजारच्या बिऱ्हाडातील दोन मुलें शाळेला जात होतीं. त्याना 'सावित्री काकू' फार आवडत.

त्यांचें ते जीवन, तो आनद पाहून सावित्रीला फार आनद वाटला.

" काय ग छबे ! शाळेत कधी जायला लागलीस ! "

" यस, प्यस् "

" अग ! इंग्रजी बोलतेस की काय ! "

" होय काकू ! मी आता म्युनिसिपालिटीच्या शाळेत नाही की जात "

" मग ? मुलाच्या शाळेत जातेस ? "

" म्युनिसिपालिटीच्या शाळेत मुल नसतात वाटत ? "

" अग. मुलांच्या हायस्कूलांत असे म्हटले मी. "

" अस्स ! हो हायस्कूलातच. पण एक जमतीचे हायस्कूल आहे हे "

" म्हणजे कसं काय ? तेथे काय अभ्यास शिकवितात की जादू ?"

" जादूने अभ्यास शिकवितात काकू, "

" वाः ! बरीच आहे तुझी शाळा. मग अक्कलेची जादुच का ?

" काकू ! आमच्या शाळेला नावे नको ठेऊस अ ! "

" नाव नाही ग ठेवली. काय नाव तुझ्या शाळेचे ! "

" सात इयत्ता "

" काय—काय ? सात यत्ता ? हे का नाव आहे शाळेचे ? "

" अग हो. आपले दामू मास्तर नाहीत का ? "

" कोऽण ? दामू भावजी ? "

" तुझे असतील भावजी ! आमचे मास्तर आहेत. त्यांनी काढली आहे ही शाळा. "

" वाः ! भावोजी मोठे पराक्रमी अ ! पण नाव नाही बाई चांगल ! का तुलाच माहीत नाही कोणास ठाऊक ?

" अग हेच नाव आहे. आम्ही त्याला सात यत्तेची शाळाच म्हणतो "

" काय काय शिकवितात तेथे ? " एका वर्षात सात इयत्ता "

" एका वर्षात सात ? अग बाई ! कशाच्या आहेत तरी इयत्ता त्या ? मग बाकीची सहा वर्षे काय करायचें ? "

" गोवऱ्या थापायच्या नि शेण वळायचें " छबी चटकन् तेथून पळाली. भलताच आवाज सावित्रीच्या कानावर आला. तिने इकडे तिकडे पाहिले.

मागे सत्यवान् उभा होता !

तिच्या अंगावर काटाच उभा राहिला.

" कशाला पाहिजेत तुला या उठाठेवी ? म्हणे बाकीच्या वर्षात काय करायच ? "

" म्हणजे माहिती विचारू नये वाटत ? आपल्या दामूभावजींनी शाळा काढली आहे म्हणे ! "

" आमचा दामू ना ? तो मनात आणल तर युनिव्हर्सिटीसुद्धां काढील ! पण लेकाला पैसे मात्र पट्टेवाल्याइतकेसुद्धां मिळावयाचे नाहींत. "

" पण ते करायची तेवढी वणवण करतात. पोटासाठी किती वणवण करावी लागते बिचाऱ्यांना ! उगाच काय गरीबाला हिणवावें ? श्रम करूनहि त्याना पुन्हां पैसेच काय अन्नसुद्धां उसने मागावे लागतें ! घरात कालवण नसल की, त्यांची मुलगी ताक मागायला येते. "

" पण आमचा दामू असा हिकमती आहे की, लोकांकडून आण-लेल ताक पाणी घालून दुप्पट करून त्याचें निमपट विकून टाकून पैसे मिळवील ! "

" मग त्याना द्या ना एखादी नोकरी लावून. कालच मला कळल त्याच घरभाडे थकल आहे. सासूबाई सांगत होत्या. "

" हो का ? " सत्यवानला एकदम चरका बसल्यासारखे झाले. तो एकदम आईकडे गेला.

" हो का ग आई ? दामूचें घरभाडे थकले आहे ? "

" हो. त्याची मुलगी आली होती गोमूत्र मागायला. "

" घरभाडे थकलें म्हणून गोमूत्र ? त्यापेक्षां तुळसीपत्र घेऊन जा कीं म्हणाव मालकाच्या डोक्यावर ठेवायला !"

" अरे तसं नाहीं. तेव्हां मी तिला सहज विचारल आणि मग तिन खर सांगितल की, आईनें तीन रुपये मागितले आहेत ! "

सत्यवानाच्या डोळ्याच्या कडा ओलसर झाल्या. माणसाच्या अवि-श्रांत श्रमाला पोटभर भाकरी इतकासुद्धां मोबदला मिळू नये !

आणि त्याचवेळीं त्याच्या मनात एक कल्पना आली की, दामू-मास्तरांच्या पोटाची कांहीं तरी सोय आपण करू शकू. आपल्यालाहि एक प्रयोग करावयाचा आहे.

दामूने सावित्रीला शिकवावे आणि त्याबद्दल आपण त्याला भरपूर मोबदला द्यावा अशी योजना सत्यवानानें ठरविली. सावित्रीवर ज्या कायाकल्पाचा प्रयोग करावयाचें त्यानें ठरविलें होते त्याचें कन्त्राट दामूमास्तरकडे द्यावयाचे ठरविल्यावर सत्यवान् सावित्रीस म्हणाला—

" काय सती सावित्रीबाई झाल का ग्रंण पोतेर? "

" काय मला चिडवता अस अलीकडे ? मी काय शेणपोते-यासाठीं हट्ट धरला होता वाटत ? दुसर काही सागा. ते करीन. "

" सगळ सांगा. अन् मग करीन. पण मी अमुक करणार आहे हें कांहीं कधीं सांगू नकोस "

" मला सवय नाहीं सागण्याची. "

" कां ! नसायला काय झाल ? पण ते कळल पाहिजे ना ?"

" सांगू का, काय करावेसे वाटते ते ? "

" सांग काय वाटत ? माझे पाय धुवावेसे वाटतात ? तीर्थ घ्यावस वाटत ? गधफुल वहावीशीं वाटतात ? सेवा का काय म्हण-तात ना याला ? "

" हो. सेवाच म्हणतात. पण तुम्हाला कटाळा आला ना त्या सेवेचा. आतां दुसरी सेवा? "

" कोणची ? कीं कोणाची ? "

" काय बोलतां हें ? आणि आपल्या पत्निविषयां ? पतिसमोर ? आणि तुम्ही स्वतःच ? "

" अलीकडचा काळ आहे हा ! काय नियम सागावा त्याचा ? आतां बायकांनाहि कळूं लागल आहे. "

" कीं, आपला पति सोडून दुसऱ्याची सेवा करावी हे ? वाः ! हेंच कळण का ? आणि असं कांहीं मला कळत नाही म्हणून तुम्ही मला नेहमीं बोलता होय ? "

" भडकलीस ! पुन्हा भडकलीस ! मग सांग कीं, काय करावेसें वाटते ते ? "

" दामू मास्तराच्या शाळेत जावेसे वाटते ! "

" शाबास ! शाबास ! तो ज्ञानाचा दलाल तुला अर्ध्या हळकुंडात पिवळी करून टाकील. ज्ञानमात्रेचे दोन वळसे दिल्याबरोबर तू विदुषी होशील ! "

" मग सांगाल तुम्ही त्यांना ? "

" हा पहा निघालोच ! "

" पण एक अट आहे बर का ? "

" काय आता अट घालतेस ? अग, नवऱ्याला, पतिदेवाला अट घालू लागलीस तू ? बर सांग अट. सांग; "

" मी त्या लहान मुलींत शिकायला बसणार नाही. मला एकटीला शिकवल पाहिजे. आणि तुम्ही येतां जातां, काय शिकलीस, किती शिकलीस असं सतावून सोडायच नाही ! "

" अगदी कबूल. नशीब म्हणायच माझं. तुला एवढी अक्कल आली. "

" आली नाहीं. येण्यासाठी शिकणार आहे. "

" येऊ येऊ द्या ! शिकण्यासाठी येऊ द्या. येण्यासाठी शिका ! मी दामू मास्तरला आपल्या घरीं बिऱ्हाडच करायला सांगतों. आईलाहि थोडी मदत होईल. कारण सूनबाई आता मॅडम होणार ! "

---

# प्रो. डो. मास्टर महाविद्यालय

## प्रकरण १० वें.

" काय वहिनी ? आमचे प्रोफेसरसाहेब आहेत का घरी ? "

" वाः ! किती थट्टा करता गरीबाची ? या ना. आहेत. बसलेत मुलं बडवीत नि मडकी घडवीत ? "

" हें महाविद्यालय केव्हा सुरू केल त्याने ?

" केव्हां नि काय ? माझं डोक फिरायची वेळ आली आहे ! "

" घरात विद्यालय असून ? जाऊ द्या वहिनी. तो तरी काय कर णार बिचारा! पोटासाठीं करतो धडपड! "

" अहो, पण तरी पोटसुद्धा भरत नाही. नुसती धडपडच चालली आहे त्यांची ! "

" तेवढे तरी करतो ना ? येईल, केव्हा तरी खडकातून पाणी येईल. दुसरा एखादा असता तर वैतागून गेला असता. राम म्हणूनच टिकाव धरू जाणे. "

" आता नाही टिकाव लागत हो! तीन महिन्याचं भाडं थकलं आहे. "

"बर. मी पाहतो. काही काळजी करू नका. काही युक्ति घेऊनच आलो आहे मी. "

"इतकच नाही. भाड देऊनहि मालक जागा सोडावयास सांगणार आहे."

"का? घराचा बंगला करायचा आहे की काय?"

"नाही बिऱ्हाडकरांना या यांच्या विद्यालयाची कटकट होते!"

"हें विद्यालयच बंद करावयाचे ! हीच माझी युक्ति आहे."

"छान् ! मग काय खानावळ काढायची?"

"छे ! दामू मास्तर हा मास्तरच राहणार जन्मभर. मास्तरकी हें त्याचें कवच आहे. अभेद्य आहे ते. त्याला अस्सल मास्तर करणार आहे मी. बर जातो. एकदा विद्यालयाला भेट देतो. माडीची सगळी जागा हल्ली भाड्याने गेली आहे वाटत ?"

"नाहीं ऽ ! आम्हीच एक खोली घेतली आहे तेवढीच याच्या विद्यालयासाठी."

"म्हणजे हा दाणदाण आवाज विद्यालयातून येतो का ?"

"हो. काही तबला शिकतात ! काही पेटी शिकतात ! काही हावभाव करून कविता म्हणतात तर काही नुसतेच शब्द घोकीत बसतात !"

"एका खोलींत सगळे हे ? किती विद्यार्थी आहेत ?"

"३ लहान व २ मोठे."

"म्हणजे ३॥ स्वाऱ्या !"

* * * * * *

सत्यवान् दामूमास्तराच्या विद्यालयात जाऊन उभा राहिला. त्या वेळीं मास्तराची पाठ दाराकडे होती. एका विद्यार्थ्यांचा सुताचा धागा तुटला होता तो ते जुळवून देत होते.

"हं. आता चाती अशी धर ! चाती म्हणजे भोवरा नाही अ

दोन हात सूत काढता येत नाही लेकाना आणि हे म्हणे सुताने स्वराज्य मिळवणार ! त्यापेक्षा सुताने स्वर्गाला जा ! स्वर्गाला जाण्यासाठीं दोर म्हणून तुझे हे सूत चांगले उपयोगी पडेल ! ब्राम्हणाचा पोरगा तू ! तुला जानव्याचं सूत काढता येत नाही !"

आणि मग मास्तर दुसऱ्या एका विद्यार्थ्याकडे वळले.

"हं वाच. येते का ती पाटी वाचता ?"

"हो मास्तर."

"मास्तर नाहीं सर ! मास्तर शाळेंत. हे विद्यालय आहे. विद्या-

ल्यांतल्या मास्तरला सर म्हणतात. सर हा प्रोफेसर या शब्दाचा शार्ट फॉर्म आहे. म्हणजे काय ? लघुरूप आहे. हं वाच. ”

विद्यार्थी वाचू लागला—

“ प्रो. डी. मास्तर

यांचे

महाविद्यालय ”

“ हं, पुढे. खालचे बारीक आहे. आता जपून वाच ”

“ एका वर्षांत कोणच्याही सात इयत्ता इंग्रजी, हिंदी, शिवाय ललितकला, धर्मज्ञान. प्रत्यक्ष शिक्षणपद्धति. ”

“ शाबास ! हं तुझं काय चालले आहे रे ? ”

“ दादरा सर ! ”

“ अजून दादराच ? तुला शंकरभय्या व्हायच आहे ना ? आणि अद्याप दादराच ! केव्हा चढून होणार तुझा हा दादर ? ”

“ मास्तर—नाहीं. सर ! ”

“ हं. अस्स. काय म्हणतोस ? शब्द झाले का पाठ ? ”

“ एक शंका आहे सर ! ”

“ शंका मग. सध्यां नुसता अभ्यास. परीक्षेच्या आधीं आठ दिवस फक्त शंका. ”

“ एक अर्थ पाहिजे सर ”

“ बर विचार. कोणच्या पुस्तकांत वाचलास ? ”

“ वाचला नाहीं ऐकला ”

“ कोठें ? कोणाच्या तोंडून ? संदर्भासह स्पष्ट कर. ”

“ तुमच्याच ! दादर म्हणजे ? ”

“ दादर—दादर म्हणजे जिना. जिना साधारणतः दाराजवळ असतो म्हणून ? ”

“ दादर ”

" शाबास. दादर हे एका स्टेशनचेहि नाव आहे. कारण त्या स्टेशनावर जिने फार आहेत. आणखी ? "

" पण दारा म्हणजे बायको ना सर ? "

" जवळ असणारा म्हणून दादर म्हणजे नवरा—पति—हजबड. "

" सर, हा काय म्हणतो पहा "

" काय रे, काय म्हणतो ? "

" मी नाही सर ! "

" सागतो की नाही ? शिक्षकापासून काहीही चोरून ठेऊ नये. शिक्षक हा आपला मित्र असतो. "

" म्हणजे शिक्षा करणारा " एक कारटे हळूच कुजबुजले. पण दामू मास्तरानी ते ऐकलें.

" काय ? काय काय म्हणालास ? जुनी कल्पना आहे ती. आता बदलली ती. "

" सर, हाच म्हणाला होता की, दादर म्हणजे दामू मास्तर "

" अस्स. तुझी नादारी काढून टाकीन ! खबरदार. "

आणि भिक्षुकपुत्राला दामू मास्तर ! ' भूर्भुवः स्वः— ' या मत्राची सथा देणार होते इतक्यात—

" मे आय् कमूईन् सर " असे सत्यवानानें विचारले.

' यस् ' असें जोरात म्हणत दामू मास्तर खालीच पहात होते आणि नतर त्यानीं वर पाहिलें—

' सत्यवान् ' समोर पाहून दामू मास्तरांना आपल्या डोळ्याखेरीज सर्व ज्ञानेंद्रियाचा विसर पडला. तो ' आ ' करून पहात राहिला आणि तसाच उभा राहून त्याने सत्यवानाचे दोन्ही हात हातांत घेतले.

" सत्यवान् ! अरे काय हें सत्यवान् "

नंतर तो सर्व विद्यार्थ्यांना म्हणाला—" उभे रहा डोळे मिटा. परमेश्वराची आठवण करा. म्हणा वदे मातरम् ! "

विद्यार्थी ओरडले " वदे मातरम् "

" नमस्कार "

" नमस्ते " एक विद्यार्थी म्हणाला.

" शाबास. बरोबर आहे. नमस्ते. आतां सुट्टी. "

" पण सर– "

" पण–बिण काहीं नाही. सुट्टी म्हणजे सुट्टी ! "

" पण आई म्हणेल पळून आलास " एक विद्यार्थी.

" आईला म्हणाव सर खोट बोलत नाहींत. "

दुसरा–" सर मग शिकून झाल नाही कीं फी– "

" फी ? फी चुकेल काय तुझ्या बापाला ? शाळा म्हणजे काय वाण्याचं दुकान आहे का ? ज्ञान मोजता येत का ? कोणाला कळतें किती ज्ञान मिळालें तें ? चल चालता हो ! चढेल लेकाचे ! मला पैशाची पर्वा नाहीं. मी ज्ञान देण्यासाठी बसलो आहे. तुला काय भीक लागली आहे शाळेत जायला ? जळेल इतका पैसा आहे घरी. "

" बाबा म्हणाले सर पुढल्या वर्षी घालायचे मोठ्या शाळेत "

" तर–तर–! आणि ही लहान शाळा काय ? दामु मास्तर इथें काय पोरं सभाळायला बसला कीं काय ? बर, देशपांडे, आईला म्हणाव मी घरी येतो कालच्या पोथीपुढचे न्यायला आणि श्राद्धाचें आमंत्रणहि पत्करलें आहे म्हणून साग. चला तोंड फिरवा. पाट्या टाका. नाही–नाही ! तोंड फिरवून चालायला लागा. वन्–टू. वन्–टू. लेफ्ट–राइट. डावी–उजवी, डावी–उजवी––! "

सर्व म्हणजे ७–८च विद्यार्थी निघून गेले.

नतर दामूमास्तर सत्यवानास म्हणाला––

" कोणीकडे आलास सत्यवान् ? अलीकडे येत नाहींस तूं ? "

" मी आलो नाहीं म्हणून तू हे उपद्व्याप सुरू केलेस वाटते ? "

" काय केले मी ? "

" हें काय चाललें आहे ? काय, विद्यालय काय नि प्रो. डी. मास्तर कोण ? "

" पोटाचा धंदा आहे. "

" फसवणूक आहे ही ! शिक्षणाची थट्टा आहे ही. "

" म्हणजेच शाळा नाहीं का ? काय असते रे शाळेंत तरी जास्त ?"

" तूच सगळे विषय शिकवितोस ? "

" हो ! काय हरकत आहे त्याला ? "

" शाळेत काय करतात ? वाटेल तें शिकवायला लावतात ? नाहीं तर नोकरी सोडायला सांगतात ! आणि शेवटी शिकविणाऱ्यावर आहे काय ? ज्ञान पाहिजे कोणाला ? परीक्षा पास पाहिजे, बस. ज्ञान नसलें तरी चालेल. आईबापानाहि ज्ञानाची पर्वा नाहीं. वेळच नाहीं त्याना. पहिल्यापासून शेवटपर्यंत ज्ञानाचा संबंध येतो कोठें सांग की ! "

" फारच वैतागलेला दिसतोस तू ? "

"छः ! तुला हें विद्यालय वगैरे पोरकटपणा वाटायला लागला म्हणून बोललो. तुला नोकरी दिली तिचा तुझ्या ज्ञानाशी काय संबंध आहे ? पास व्हायचें—वशिला. नोकरी पाहिजे वशिला. बढती पाहिजे वशिला ! पुस्तकें नेमण्यापासून वशिला ! कोणाला कळकळ आहे बाबा ज्ञानाची ? "

" पण तू त्या चुकीला उत्तेजन का देतोस ? "

" कशाची चूक ? अरे ? वाः रे ! गावात पहा. शाळा एकपट तर क्लासेस दसपट. सक्सेस क्लास, एक्झामिनेशन क्लास, न्यू क्लास, कोणी विचारलें आहे त्याना कधी ? आणि अरे, मी एका ठिकाणी मास्तर होतो. चागले जमले होते माझे. पण हातातलं पुस्तक जुने होते म्हणून एक शहाणा काय म्हणाला " तुम्ही अप-टु-डेट पुस्तकावरून माहिती मिळवावयास पाहिजे. " असे शहाणे असतात लेकाचे ! अन् हे क्लासेस काय करतात ? तिकडे कोण पाहतो ? खुशाल पैसे भरून— छट् ! संताप होतो नुसता माझा. ज्ञान म्हणजे काय जोगेश्वरीच्या तेथं मिळणारें दूध

झाल आहे. गिऱ्हाइक आल की घाल पाणी ! मग आम्ही केल तर का रे बाबा ! कमी पोर आहेत म्हणून ? "

" नाहीं रे ! मी सतापलो नाही तुझ्यावर. माझा विचारण्याचा हेतु असा की– "

" यात तरी पोट भरतय का ? " आतून रुक्मिणी, दामू मास्तराची पत्नी हिनें विचारले.

" हो-हो ! भरतय. नाही भरल तर काय झाल त्यांत ? वेळ तर जातो बरा. नुसते रिकामे बसून वाळण्यापेक्षां कामाने काटक तरी होईन "

" किती मिळतात तुला या धद्यात ? "

" अरे ! अद्याप रीतिवर्तमान काळ वापरण्याची वेळच आली नाही. मिळतील म्हण. भविष्यकाळ वापर. "

" का ? किती दिवस झाले ? "

" मला विचारा भावोजी, मी सांगते "

" बर, तू साग "

" चार महिने झाल. अद्याप घरभाडे सुटत नाहीं. मी सवाष्णीची आमत्रणें घेते आणि शक्य तोवर मेहुणाचे आमत्रण मिळविण्याचा प्रयत्न करते ! "

दामू मास्तर चिडून म्हणाले " अन् श्राद्धाचे, सत्यनारायणाचे पैसे कोण मिळवितो ? अरे कालच मिळालेल्या दोन पावल्या अद्याप कनवटीला आहेत, बघ. "

" बर. हें विद्यालय बद करण्याची तयारी आहे का तुझी ? "

" ऑं—बद ! कारे बाबा ? ही काय ग्रँट घेतलेली खाज़गी शाळा की काय ? "

" भावोजी, मी घेते ती जबाबदारी. तुम्हीं पुढे बोला. "

" अरेच्या ! आधीं कांहीं तरी ठरलेलें दिसतें. तू खालीं बसला असशील. हिनें तुझा गैरसमज केला असेल ! बर. काय बोलवोस ? साग ना ! "

" माझ्या पत्नीला इंग्रजी शिकवायच आहे."

" काय ? बायकोला शिकवतोस तू ? अरे, अगदीं माधवराव रानडेच दिसतोस. काय रे—काय अडल आत्ताच तिला शिकविण्या-वाचून ?"

" हौस आहे एक."

" तिची—नाहीं, त्याची की तुझी ?"

" दोघाची."

" थापा मारू नकोस. वहिनीना मी काही आजच ओळखीत नाहीं. त्याना नाही हे चाळे सुचायचे. तुझेच आहे हें."

" बर, माझी हौस का होईना."

" मग मी सागतो ते ऐक."

" काय ? 'नाही' नाहीं ना सागणार ?"

" मी सांगतो ही हौस नाहीं अवदसा आहे ?"

" अरे ! विद्यालयाचा प्रोफेसर ना तू !"

" प्रोफेसर असो नाही तर प्रोप्रायटर असो. मी सागतो तें दामू-मास्तर म्हणून मागत नाही. दामू, तुझा मित्र म्हणून सांगतो."

" त्यात एवढं भयंकर काय होणार आहे ?"

" तें करून दाखविण्याची आपली तयारी नाही. आणि म्हणे इंग्रजी त्यांतल्या त्यात ! का ? मराठीच आटोपल वाटत ? आपण नाहीं शिकवणार !"

" दामू ! तुझा माझ्यावर विश्वास नाहीं ?"

" कशाचा विश्वास ?"

" कीं, माझी बायको करील ते चागलच करील. सहज जमल तर पहायच. तुझहि काम होईल."

" पहा बुवा ! मी आपला तुझ्यासाठीं. मित्रासाठीं—! नाहीं तर वहिनींना वाटायचे कीं, एवढे दामू भावजी पट्टीचे मास्तर असून आम्हांला काय उपयोग त्याचा ?

" अस्स. जरा ठिकाणी ये ! बर, तुला विद्यालयात काय मिळतें येथें ? "

" मिळते ? कोणाचा बाप आणून देतो का ? मी मिळवते.. घाम गाळून मिळवतो.

" बर, मिळवतो ! किती मिळवतोस ? "

" तुला काय पचाईत त्याची ? तुझी भीति वाटते बाबा ! "

" कशाची ? फटकन् उपकार करून ठेवायचास ! "

" उपकार नाही. किती द्यावयाचे ? "

" काही वाटत नाहीं कां रे तुम्हाला विचारायला ? काय मित्र आहांत की कोण आहांत ? मित्राच्या पत्नीला चार अक्षर शिकवायची. म्हणे किती घ्यावयाचे नि किती द्यावयाचे ! मग त्या शिकवणी—ब्यूरोत जा कीं ! "

" कोणचा शिकवणी—ब्यूरो ? "

" वा: ! इथ वाढपी—मंडळ, आचारी—मंडळ आहे. तसच एक शिकवणी—मंडळही आहे. तेथे मिळतात मास्तर, शिक्षक, टयूटर, कंपॅनियन, गाईड—काय वाटेल ते. आमच्यात कांही चार दोन सद्गुण तरी राहूं द्या कीं ?

" मित्रापासूनहि पैसे घेऊन चार दोन टिकल्यासाठीं उगाच कमी-पणा कशाला आणतां आमच्या सद्वर्तनाला ? "

" मी तुला पंधरा रुपये द्यावयाचे ठरविलें आहे. तू काही समज त्यांत ! "

" काय ? काय ? पंधरा ? खर बोलतोस हें सत्यवान् ? "

" अर्थात् ! तुझी थट्टा करीन मी कधीं अशा बाबतींत ? "

" अरे, मी चोरी केली तरी पंधरा एकदम मिळावयाचे नाहींत. खरच सत्यवान्, जन्मभर तुझी सेवा करीन. मी इंग्रजीच काय वाटेल ते शिकवीन वहिनींना. खरच तूं पंधरा रुपये कां देतोस मला कळत नाहीं. "

" म्हणजे ! "

" पधरा देण्याइतके हे काम महत्त्वाचें आहे का रे ? मग लोक लेकाचे आम्हाला चवल्या पावल्यावर का बोलावतात ! आणि तेहि देत नाहींत वेळेवर. माझ्या लहानशा शाळेतसुद्धा फी—बाकीचे सदर आहे."

" कारण मी तुझी योग्यता ओळखतो. "

" अर्थात् ! योग्यतेशिवाय मी एक पैसासुद्धा घेणार नाहीं. तुला सिद्ध करून दाखविन. मग पैसे घेईन. आम्हाला काय वाटत नाहीं योग्यता दाखवावी असे ? पण पहातो कोण ? तपासतो कोण ? मी या मुलांना जे शिकवतो ते काय माझ्या मनाला बोचत नाही ? मला ठाऊक आहे. ही बदमाषी आहे हा व्यापार आहे. हें शिक्षण नाहीं. एक वर्षांत सात इयत्ता म्हणे ! इयत्ता काय आट्यापाट्या आहेत ? आम्हाला काय आमची वर्षे आणि इयत्ता आठवत नाहींत ? पण शेवटी झालो बेरड. मनाशीं ठरवले. आता प्रोफेसर होऊन दाखवतों. विद्यालय चालवतो. बनतात लोक बनवले कीं ! कोणी मला विचारलें नाहीं, तू प्रोफेसर केव्हा झालास याला विद्यालय कां म्हणतोस ? मन खात असतें मला आणि मी मोठमोठ्याने ओरडून मनाला गप्प बसवतो. पण तू सोडवलेस या पापातून. तुझ्या पै न् पैचे चीज झालें असे मी पटवीन तुला. "

" ठीक आहे. मला नको पटविण्याचे श्रम घेऊस. आणखी कांहीं अटी आहेत. "

" अरे, कशाच्या आल्यात अटी ! चला, घाला कुलूप विद्यालयाला. तू काय अटी घालतोस ? आज्ञा म्हण आज्ञा. "

" तुम्हीं घरीं येऊन राहिलें पाहिजे. आणि तू फक्त सावित्रीस शिकवले पाहिजेस. दुसरे कांहीं धंदे करावयाचे नाहींत. "

" ठीक आहे. शिकवणी संपेपर्यंत आम्हांला मेहूण सांगितलेंस असे का म्हणेनास. चला. या विद्यालयाच्या पाटीमागेंच नोटीस लावतों कीं, विद्यालयाला सुट्टी आहे. अंटिल् फर्दर नोटीस "

" पण मालक नोटीस देतील ना आधीं " रुक्मिणी धीर करून म्हणाली.

" हो ! ती एक अडचण आहे. सत्यवान्, तीन रुपये ॲडव्हान्स दे. महिना पुरा झाल्यावर कापून घे. "

" आणि वाणी ? "

" हो. अरे त्यापेक्षा असेंच कर ना ! पधराच्या पधरा दे. दुसऱ्या महिन्याचा पगार दोन महिन्याच्या शेवटी दे. मग तर झाल ? कारण त्याच अस आहे. आम्हीं येथें राहतो. म्हणून देणेदार थाबलेत. आम्हीं निघालों की, ते जमा होतील. सगळ्याना चीत करतो. जा ग वाण्याला बोलाव. बिल घेऊन ये ह्मणाव आणि पावतीपुस्तकसुद्धा. तीन वाजायच्या आंत नाहीं आलास तर एक छदाम मिळणार नाही ह्मणाव. आणि मालकालाही निरोप साग. मालक नसला तर मालकीण, नाहीं तर मोलकरीण ! लवकर चला म्हणावे. आम्हाला कामे आहेत. विद्यालय बद करायच आहे. शिकवणीच काम आहे. पधरा रुपये किंमतीच काम आहे. थट्टा नाही. वहिनींना शिकवायच आहे. चला. बोला; वदे मातरम् ! खड्डू, आण खड्डू. नोटीस लिहायची आहे."

---

# नवयुगाला सुरवात

## प्रकरण ११ वें

दामू मास्तरची शिकवणी ही सावित्रीच्या जीवनांत त्या नवयुगाची सुरवात होती. सावित्री कशासाठीं शिकत आहे, तिला किती मर्यादा गाठावयाची आहे, वगैरे दामू मास्तरना काहीं माहिती नव्हते. सावित्रीला तर त्याची कल्पनाच नव्हती- सत्यवानानेहि त्याचा कधीं विचार केला नाही. काही तरी फरक करावयाचा, जोरात काहीं तरी नवे करावयास सुरवात करावयाची असे वाटून त्याने एकदम दामूमास्तरचे 'मेहुण' घरी आणून ठेवले. वास्तविक पत्नीच्या शिक्षणासाठीं एवढा खर्च करण त्याला परवडणे शक्य नव्हते. दामूअण्णाला त्याने आपल्या वाड्यात जागा घेऊन दिली. त्यावेळीं त्याला दिसून आले कीं, त्याच्या नि आपल्या ससारात फारसे अतर नाही आणि एका दृष्टीने फारच अतर आहे असेंहि त्यास कळत होते.

त्याच्या व दामूमास्तरांच्या समाधानात किती तरी अतर होत ! दामूअण्णाच्या मनात कोणच्याहि आधुनिकत्वाची यत्किंचितही तळमळ नव्हती. पोटापुरते मिळविणें एवढेच त्याचे ध्येय होते. कित्येक माणसाचा पोटाचा प्रश्न इतका कठीण असतो कीं, त्याना आपल्या मनाचा पूर्ण विसर पडतो नि फक्त पोटाच्या खळगीचीच स्मृति राहते. शक्य असेल तोपर्यंत ते सद्गुणाची सगत टिकवितात. पोटासाठीं आपण आपल्या सत्प्रवृत्तीना मुकू नये अशी त्यांची तीव्र इच्छा असते. परतु शेवटीं पोटामुळे सद्गुणाचे लाड चालत नाहीत आणि हळूहळू ते जगांत ' बनत ' जातात. दामूमास्तर हा त्या पथाला जात होता; परतु सत्यवानाच्या घरची शिकवणी मिळाल्यानें त्याचे मन फार संतुष्ट झालें. त्याला कशाचीहि हाव नव्हती. रुक्मिणी म्हणजे त्याच्याच जीवनाची एक पुरवणी होती.

दामू मास्तर सत्यवानाच्या घरातच राहू लागल्यानतर त्याला त्याच्या जीवनाचे इतके दिवस अज्ञात असलेले कप्पे दिसले आणि अरुधती-विषयींची त्याची ओढ त्याच्या लक्षात आल्यावर त्याला धक्काच बसला. सावित्रीची त्याला कीव आली ! एकप्रकारे हे वेश्येसारखे जीवन आहे असेहि त्यास चिडून वाटे.

वेश्या तरी दुसरे काय करतात ? त्या अनेकाच्या मनाप्रमाणे आपल्या जीवनाची रगसफेती करीत असतात आणि सावित्री फक्त एकाच माणसाच्या मर्जीप्रमाणे नाचत होती. फार काय हे जीवन, हे पारतन्त्र्य वेश्यापेक्षाही हिणकस आहे. कारण वेश्यांना आपल्या व्यवसायात, इच्छास्वातत्र्य असत. त्यांना आर्थिकस्वातत्र्याचा मोबदला तरी मिळतो. परतु तेहि ज्याना मिळत नाहीं, किबहुना त्याची ज्याना गरज नाहीं त्याच्यावरसुद्धा त्या जीवनाची सक्ति व्हावी हे तर फारच केविलवाणे जीवन झाले आणि त्याबद्दल जबाबदार असलेले सत्यवान् ! त्याच्या जीवनाला माणसाचे लेबल लावले आहे म्हणूनच केवळ त्याना माणूस म्हणावयाचे !

सावित्री व अरुंधती याच्यांत सत्यवानास कह्यात ठेवण्याची एक प्रकारे शर्यत सुरू झाली. सत्यवानास अरुधतीच्या सहवासात जो आनद मिळतो तो सावित्रीस देता आला पाहिजे. सावित्रीलाही याची जाणीव झाली होती. आपली सेवा, भक्ति, एकनिष्ठा ही सर्व मातीमोल ठरून केवळ नटवेपणाचीच कसोटी आपल्या जीवनास लागण्याची वेळ यावी त्यापेक्षां सत्यवानास मोकळें करावे व आपणहि मोकळे व्हावे असे तिला वाटे.

ती मास्तरांजवळ इग्रजी शिकू लागली. आणि शिकतां शिकतां तिच्या मनांत एकच विचार घोळत असें कीं, सत्यवानास पाहिजे तें इंग्रजी हेच कां ? एवढें शिकून तरी ते सतुष्ट होतील का ? कॅट म्हणजे मांजर नि डॉग म्हणजे कुत्रा हे दामूमास्तर तिला घोकावयास सांगत आणि ती मध्येच काहीं प्रश्न विचारी—

" अण्णा, पण नवरा–बायकोतल्या सभाषणांत कॅट नि डॉग, कुत्रा नि मांजर हे शब्द कशाला येतात ? "

" अहो, पण ते इंग्रजी पुस्तकांत दिलेले आहेत ना ? "

" मला काय करायचे पुस्तकाशीं ? मला त्यांना आवडेल तें व तितकेच इंग्रजी शिकावयाचे आहे. "

" पण ते एकदम कसे येईल ? "

" का ? मग किती दिवस लागतील ? "

" तसे कांहीं फार दिवस नाहीं लागणार. पण थोडे तरी लागतीलच. अहो, सात हजार मैल दूर असलेल्या देशांतील भाषा आहे ती ! इतक्या लाबून ते इंग्रजी येणार म्हणजे थोडा वेळ लागायचाच. "

" तसे नाहीं. मी तुम्हाला सागते. आम्हीं इतक्या दिवस मराठींत एकमेकाशी बोलत होतो ना, तेच आता इंग्रजींत बोलावयाचे आहे. तसे ते माझ्याशी फार बोलतही नाहीत. पण जे काय थोडे बोलणें चालणे होणार ते इंग्रजीत व्हावं अशी त्यांची हौस आहे. तेवढ्या त्या बोलण्याचे इंग्रजी मला शिकवा. "

" पहातों. यालाच डायरेक्ट मेथड म्हणतात. "

" काहींहि म्हणा त्याला ! मला फक्त घरांतच आणि तेंहि त्यांच्याशीं इंग्रजी बोलायचे आहे. तेवढे शिकवा. येईल ना मला तेवढें ? '

" हो. का नाहीं येणार ? "

" तुमच्या ' हो ' ला तरी काय आधार आहे ? "

" मी स्वत: ! मी आणणारा असल्यावर काय येणार नाहीं ? "

" हो. बाकी तुम्ही १ वर्षात ७ इयत्ता शिकविणारे शिक्षक आहांत ! "

सावित्रीची खरोखरच दामू मास्तरांच्या कर्तृत्वावर श्रद्धा होती. तिला त्यांच्या महाविद्यालयाचें अतरग मुळींच माहीत नव्हते. अशा विद्यालयांत जाहीर केलेल्या अतिम मर्यादेपर्यंत कोणीच रहात नाहीं. येणारे मुळांतच बेताबाताची हौस असलेले असतात. ते मध्येच कटाळसात आणि सोडून देतात. त्यामुळें विद्यालयाच्या अध्यापनाची कधींच

कसोटी लागत नाहीं. गल्लोगल्लीं ज्ञानाच्या, 'विविध ज्ञानाच्या' स्पेशल-सोई आहेत. प्रत्येकजण काही तरी जाहीर प्रतिज्ञा करून बसलेला आहे. परतु पुन्हां समाजांत किंवा त्या गांवांतसुद्धा विद्वत्तेची कांहीं वाढ होत नाहीं.

सावित्रीच्याहि इग्रजीच्या ज्ञानात काही वाढ होत नव्हती. दामू-मास्तर जीव तोडून शिकवीत परतु सावित्रीवर त्याचा कांहींहि परिणाम होत नव्हता.

वहिनींना अस्सल इग्रजी बोलता आले पाहिजे या हेतूने तो एक एक उच्चार त्याच्या तोडीं बसविण्याची पराकाष्ठा करी. येथे जीभ लावा, तेथें टाळू लावा, असे त्याचे मार्गदर्शन चाले. परतु सावित्री अगदीं रडकुडीला येई.

परतु दामू मास्तरच्याहि डोक्यात कोणी तरी ते वेड शिरवले होते कीं, नुसते इग्रजी समजण्यात काहीं विशेष नाहीं. ते थोडे कमी समजले तरी हरकत नाहीं. पण साहेबासारखे बोलतां मात्र आले पाहिजे. या अट्टाहासाच्या पायीं एकादा र—ट्—फ़, बरोबर (?) उच्चारण्यास शिकविण्यात कालव्यय होतच असतो. शिक्षणाच्या हेतत् विसगति होते. कारण परकीय मनुष्य, परकीय भाषा, तींतील ज्ञानभाडार कळण्यासाठीं शिकतो. ती ज्याची मातृभाषा आहे त्याच्यासारखा बोलण्याचा हट्ट ही 'फॅशन' झाली. मातृभाषेच्या उच्चाराची पद्धति ही काहीं सिद्धातमय सवयी व सोय याच्यावर अवलबून असते. हे विसरून दुसऱ्याची मातृभाषा उच्चारात आत्म-सात् करण्याचे वेड हे उघडउघड अनैसर्गिक आहे. परतु प्रत्येक व्यवहाराप्रमाणे शिक्षणशास्त्रातहि काही रूढि आहेत. त्यांतील ही 'र् ट् फ़' इत्यादि उच्चाराच्या अट्टाहासाची रूढि आहे. साधारणपणे अशी समजूत आहे कीं, जो फार थोड्याना समजतो तो ग्रंथ! तसेंच इग्रजीच्या बाबतींत अशी एक समजूत आहे कीं, इतरांस सहजीं न समजणारें असें जें इंग्रजी बोलणें ते सफाईदार साहेबी बोलणें.

सफाईदार इंग्रजी बोलण्याची ही तालीम सावित्री येतां जातां करीत होती.

घरात कांहीं विलक्षण वातावरण उत्पन्न झाले होते. सत्यवानाची आई तर थक्कच झाली होती. कारण आपल्या जीवितातील नवयुगास सुरवात करताना आईला जुमानावयाचें नाहीं येथपासूनच सत्यवानानें सुरवात केली होती. पुनः सावित्रीचें तें वेड ! ती काम करता करता शब्द घोकावयाची, उच्चार घोकावयाची आणि हातात सापडेल त्या साधनानें अक्षरे गिरवीत बसावयाची. सत्यवान् हा सगळा खेळ पहात होता. सावित्रीचे हे हाल पाहून रुक्मिणीला मात्र कींव येत होती तिची! सावित्रीच्या भोवतीं हा जाच का सुरू झाला आहे हे तिला कळेना ! झोपेतसुद्धा सावित्री ए. ए. बी. बी. करावयाची. आणि सत्यवान् जागा होऊन तिच्याकडे पहात मनात म्हणावयाचा.–

" छे ! काय येणार आहे हिला ? या जन्मी हिची मुळाक्षरं झालीं तरी मिळवली. इंग्रजी शिकलेली बायको पाहिजे असेल तर ती बायको होण्यापूर्वीं इंग्रजी शिकलेली पाहिजे. ! "

असे विचार मनात आले कीं, सत्यवानास शेवटी स्वतःचेच हसू येत असे ! तो शेवटी स्वतःलाच समजावून सांगे–

काय विटंबना आहे ही माझ्या जीवनाची ? संसाराचें लोढणे गळ्यात अडकावून मी पळणार तरी किती ? मी तरी काय करावं ? हे सगळे अगदी डोळ्यासमोर नकोसे होते. काय पत्नि ? काय म्सार ! माझ्या हाताने केले मी सगळे हे ! खरच मीच नाही का याला जबाबदार ?

आणि शेवटी तो जागतिक विषमतेपर्यंत विचारानी मजल मारी आणि अरुंधती व वसिष्ठ हेहि विषमतेचेच एक उदाहरण आहे असे म्हणत, त्याला एखाद्या वेळीं आराम खुर्चीवर बसल्याबसल्याच झोप लागे.

अशा स्थितींत साविली जागी झाली की, ती चटकन् उठून सत्यवानाच्या अंगावर हळूच शाल घाली. आपण तेथे खाली झोपून जाई-

सत्यवानास हें दृश्य एखाद्या वेळीं दिसे ! ' हिला हे सेवेचें तंत्र मात्र बरोबर जमलं आहे ! " असे त्याला वाटे. त्याला सहचारिणीची भूक होती आणि मिळाली होती ती आदर्श ' सेविका ' होती.

# फॅशन नि शिक्षण

## प्रकरण १२ वें.

" दमले मी दामूअण्णा ! नाहीं येणार मला इंग्रजी ? " एक दिवस सावित्री कटाळून म्हणाली.

दामूमास्तरच्या डोळ्याला पाणीच आले; तरी तो सावित्रीचे सात्वन करण्यासाठी म्हणाला—

" येईल. वहिनी येईल ! मी सत्यवानाजवळ प्रतिज्ञा केली आहे. "

" खोटी ठरणार आहे ती प्रतिज्ञा ! किती माझा उपहास करतात ते ? मी त्यांना कोणीकडून म्हणाले असे झाले आहे मला. "

" इंग्रजी येत नाही म्हणून उपहास ? "

" हो. म्हणून तर ! इंग्रजी येणे हा गुण आहे का हो ? "

" म्हणजे काय ? फारच अवघड प्रश्न पडला हा. "

" म्हणजे अस——खर बोलण हा गुण आहे ना ? "

" हो. अस म्हणतात ! "

" म्हणतात तें खर आहे. "

" बर पुढ ? "

" म्हणजे तो गुण माणसात पाहिजेना ? नसला तर ते व्यग आहे. तसं आहे का इंग्रजीचं ? ज्याला इंग्रजी येत नाही. तो काय नालायक ? "

" तसे ज्याला वाटत तो असेल नालायक ! मी सागु का त्याला तोंडावर ? "

" नको. काय होणार आहे सागून ? "

" सांगा ना ! काय सांगायचें आहे ? हे पहा माझे तोंड ! " सत्यवान् आंत येत खेकसला.

" हो. हो. मी सांगतों. तुला वहिनींना फॅशनेबल करायचे आहे ना ? "

" फॅशनेबल नाहीं सुशिक्षित ! "

" हो. हो ! सगळें माहीत आहे मला. सुशिक्षितहि पाहिलेले नि फॅशनेबलहि पाहिलेत मी. काय तुझी कल्पना आहे सुशिक्षिताबद्दल ?"

" तूच का विचारतोस हे ? "

" हो. मी सुशिक्षित नाहीं का ? "

" म्हणूनच तुझ्या विचारण्याचे आश्चर्य वाटते. तुला तर माहीत आहे. "

" समजा एखाद्याला इंग्रजी येत नसले तर तो–"

" सुशिक्षित नाहीं. झाल ? मी त्याला सुशिक्षित म्हणणार नाही. बर, चालू द्या तुमच. मी जेवायला येणार नाही हे सागायला आलो उभ्या उभ्या ! "

" पण आता कुठ चाललास ? "

" फिरायला. ही सुशिक्षिताची फिरण्याची वेळ, दामू मास्तर ! "

सत्यवान् पाहता पाहता निघून गेला. सावित्री ही मुलाखत नुसती ऐकत होती. सत्यवानाकडे डोळे वर करून पहाण्याचे सुद्धा तिला धैर्य नव्हते. इंग्रजी शिकण्याच्या आपल्या विनतीला मान देऊन उपहासाचे एक हत्यार सत्यवानानें हातीं घेतले आहे हे तिला आतां समजले.

अरुधतीशीं बरोबरी करण्याबद्दलचे हे प्रायश्चित्त आहे असे आतां सावित्रीस पटू लागले होते.

दामू मास्तर चिडून म्हणाला–" गाढवा ! घरच्या लक्ष्मीला लाथाडून बाहेरच्या गावभवानीची पूजा करतोस ? तुला बायकोला फिरायला घेऊन जायची लाज वाटते ? ठीक आहे. वहिनी, सत्यवानास घरीं परत आणीन अगदीं तनमनासह घरी परत आणीन तरच नांवाचा दामू मास्तर. पण मी सांगेन तस वागायच हं ! आहे, ना कबूल ? "

सावित्री डोळे पूर्णपणे उघडून त्याच्याकडे नुसती पहात होती. दामूमास्तर ही व्यक्ति तिला विभूतिसारखी वाटू लागली ! किती उदार

मन ! किती स्वच्छ अंतःकरण ! भगिनीप्रेमाचे एक मूर्तिमंत सोज्वल स्वरुप आपल्या पुढें उभे राहिले आहे असे सावित्रीला वाटले.

सावित्री कांहीं क्षणाने बोलू लागली,—"अण्णा, तुम्ही कधीं साहे-बाचे संसार पाहिले आहेत का हो ?"

" हो. अहो, सगळी दुनिया पाहून बसलो आहे मी ! "

" त्यांच्या बायका कशा वागतात ? "

" कशाच्या बायका त्या ! नुसत्या बाया ! तुमच्या नखाची सर येणार नाही त्याना. त्याना ना घर ना दार !"

" त्या आपल्या पतीला काय म्हणतात हो ? "

" काही म्हणत नाहीत "

" वाः ! अस कस होईल ? "

" अहो ! जिथे नवऱ्याला काही विचारायच नाही तेथे म्हणण्याचा प्रश्नच येतो कुठे ? "

" आम्ही जस म्हणतो ' इकडून ' ' तिकडून ' 'इकडून येण झालं' तस इंग्रजीत काय म्हणतात ? चार बायकाचे मी पाहिलें त्या ' इकडून ' ' तिकडून ' करतात. मींहि करायला लागले. पण यांना सतापायला तेवढच कारण ! म्हणे तू माझ नावच टाकलस ! आता इंग्रजींत काय म्हणतात ते सागा. मी इंग्रजीत म्हणेन. "

दामू मास्तराला मोठा प्रश्न पडला. कोणच्याहि पुस्तकात नव्हत तें ! मराठी भाषेचा मोठेपणा सिद्ध होण्याची वेळ आली होती. मना-तल्या मनात त्यानें पुष्कळ आठवून पाहिलं. आणि क्षणोक्षणीं त्याला पटत गेलें कीं, भाषेचे काही विशेष असतात कीं, जे दुसऱ्या कोण-च्याहि भाषेला घेतां येत नाहींत. प्रत्येक भाषेचे ते अलंकार आहेत. पण हे सावित्रीला सांगावे कसें ?

इंग्रजींत याला शब्द नाही हे म्हणणें तिला पटणें शक्य नव्हतें. उलट तिला असें वाटावयाचें कीं, अण्णाचे इंग्रजी कच्चें आहे.

शेवटीं दामूमास्तरातला मास्तर जागृत झाला. आणि त्याने भाषेच्या सौंदर्याची काहीहि दयामाया न करता—

" इकडून येण झाल "  याचे " कमिंग हॅपन्ड फ्रॉम देअर " असे भाषातर ठोकून दिले.

सावित्री ते घोकू लागली ! दामू मास्तरला आनद झाला. परतु त्याचे मन त्याला खाऊ लागले कीं, आपण आपले अज्ञान लपविण्या-साठी या प्राजल 'विद्यार्थिनी' ची फसवणूक केली. तो अद्याप पक्का शिक्षक झाला नव्हता. विद्यार्थ्यांच्या मनात थोडासा आदर कमी झाला तरी हरकत नाहीं. परतु आदर कमी होईल या भीतीने काही धाडकन् ठोकून देण्याची त्याला पक्की सवय झाली नव्हती. त्यामुळे त्याने वेळ मारून नेली. मागाहून त्याच्या मनाला रुखरुख लागली. तोच एखादा पक्का बनलेला असता तर—?

बनलेला शिक्षक अडचणीना जुमानीत नाही. विद्यार्थ्यांच्या शकाकुशा-काना दाद देत नाही. आपले अज्ञान लपविण्याची, आपले अर्धवट ज्ञान न दाखविता विद्यार्थ्यांवर वजन मारण्यासाठी शिक्षकाच्या धद्यातहि कांही गुरुकिल्या असतात. वर्षभर आळशी असलेले शिक्षक शेवटीं विद्यार्थ्यांना परीक्षेचे प्रश्न सागून टाकून मोकळे होतात ! विद्यार्थ्यांचेहि काम झाले, परीक्षेचा निकालहि उत्तम लागला. पुन्हा नोकरीहि कायम राहिली ! कमी दगदगींत नोकरीची शाश्वती ! असे शिक्षक वर्गाबाहेर व असे विद्यार्थी परीक्षेनतर नामशेष होतात ! बहुतेक विद्यार्थी पास होण्यासाठी अभ्यास करतात आणि त्यापेक्षा जास्त बुद्धिवैभव अस-लेल्या विद्यार्थ्यांना शिक्षकाकडून फार थोडी मदत होते ! याचे कारण शिक्षकाच्या व्यवसायाचे वैशिष्ट्य ' भाकर-तुकडा ' मिळविण्याच्या मारा-मारीत शिल्लक रहात नाहीं.

शिक्षणसस्थांना कारखाने म्हणणे हें सुद्धा पुष्कळ स्तुतिपर वर्णन झालें ! कारण कारखानदार पैशासाठीं कां होईना गिऱ्हाईकांचा सतोष हें ब्रीद पाळतात. येथें तो प्रश्नच नाहीं. येथें गिऱ्हाईकच गरजू असते.

जितके विद्यार्थि दरवर्षी शिक्षणक्रमाच्या शेवटच्या परीक्षेतून सुटतात त्यापेक्षा किती तरी पटीने भावी विद्यार्थि जन्माला येतात ! जननसंख्या सारखी वाढते. त्यामुळे शिक्षणाच्या प्राथमिक दाराशीं खूप गर्दी होते. त्या मानाने पुढचे लोक सरकत नाहींत. आणि मग नव्या नव्या शिक्षण संस्था निघतात. तरी विद्यार्थि शिल्लक राहतात. नापास झालेले बाजूला ओघळतात आणि मग त्याना गोळा करून आपले पोट भरणारे खाजगी कारभारी महाविद्यालये उघडून बसतात. वाटेवरच्या खाणावळी-सारखे असते या ' क्लासेस ' नामक संस्थाचें !

पुढे चालू लागण्यापुरते बळ येईल एवढेच सत्त्व त्या वाटसरांना मिळते. पैसे मात्र भरपुर द्यावे लागतात ! तसेच विद्यार्जनाच्या वाटेवर दमलेले, थाबलेले विद्यार्थि 'छा—छू' करून, फूकर मारून, तयार करून एकदां पुन्हा वाटेला लावणे एवढेच याचे काम !

त्या कामाचा दर्जा तो काय असणार ? दामूमास्तरलाच कोणी विचारले असते तर त्याने काही एक न बोलता त्याच्या विद्यालयास भेट देण्यासाठी फक्त बोलाविले असते !

सावित्रीला इंग्रजी शिकवण्यात वेळ घालविण्यापेक्षा तिला आधुनिक राहणी शिकवली तर सत्यवानाचे मन घराकडे खेचता येईल असा मास्तरांनी अदाज केला आणि त्यानीं त्या दृष्टीने हालचाल करावयास सुरवात केली.

" सुशिक्षित म्हणजे फॅशनेबल " असे त्याने सत्यवानला जे सागितले होतें तें खरेच आहे अशी त्याची खात्री होती. तेव्हा सावित्रीला फॅश-नेबल केली पाहिजे; तरच ती अरुधती पुढे टिकाव धरणार ! सत्य-वानला घराकडे खेचून आणावयाचें असे सगळ्यांनीं ठरविले व प्रत्ये-कानें आपापल्या परीने चळवळ करावयास सुरवात केली.

ज्यांच्या घरांतल्या सावित्रीस असे कोणीहि दामूअण्णा नसतात त्यांचें या परिस्थितींत किती भयकर हाल होतात !

दामूमास्तर एका मित्राबरोबर या विषयावर एक दिवस बोलत बसला होता. तो मित्र म्हणाला—

" सत्यवान् सारखा शहाणा माणूस—"

" हे काय शहाणपणच लक्षण झाल ? "

" हो तर ! शहाणा म्हणजे सुशिक्षित—शिकलेला—म्हणून तर त्याची नि अरुधतीची ओळख. "

" अस्स. अरुधतीच्या यजमानास काय म्हणणार ? "

" तो वसिष्ट ! तोहि शहाणाच. "

" साधा शहाणा कीं दीड शहाणा ? "

" काय करणार तो तरी? पत्नीला नटणं, मुरडणें, हसणे, खिदळणें हे जीवन आवडत आणि पतीला ग्रथ—अध्ययन. याखेरीज कांहीं सुचत नाही. अशा स्थितीत पतीने पत्नीला तरी कोणच्या तोडानें सागावे ? "

" सांगावे लागते का हे ? ती बया शिकलेली आहे ना ? "

" हे तिच्याइतकेच इतरानाहि माहीत आहे. समजा, वसिष्ट तिला काही सागू लागला की, हे चागले नि वाईट आणि तिने तें जुमानले नाहींतर—काय करणार ? शहाण्याला शब्दाचा मार आणि मूर्खाला चाबकाचा मार. परतु जे शहाणे शब्दानाहि दाद देत नाहींत ते जगात अजिंक्य आहेत. "

" मला अस नाही वाटत. लोक शहाण्यांना सांगायला भितात. अरुधतीला चार लोकात कोणी तोडावर सांगितले कीं, बया, स्वतः ससार करावयाचा नसला तर नको करूस. पण दुसऱ्याच्या ससारावर कां निखारे ठेवतेस ? "

" ती म्हणेल की, ज्याने त्याने आपापले ससार साभाळावेत. मी कांही कोणाला ससार सोडून येण्याच्या ' अर्जेट ' तारा पाठविल्या नाहींत. ! "

" मग त्या संसारभ्रष्टांनाहि सांगावें. त्यांचाहि सामाजिक व्यवहाराच्या माणसांचा कांहीं जमाव असतोच कीं नाहीं ? "

" पण ते सगळे सारखेच असतात. सुशिक्षित माणसाचे अनाचार सगळ्यांना कळले तरी कोणी त्यांना बोलू शकत नाहीं. "

" जाऊ द्या. आपल्याला काय करायचें, अशा वृत्तीचीं माणसे शिकलेल्यांत फार आहेत. सामाजिक जाहीर निंदा, जाहीर निषेध हे फार मोठें हत्यार आहे. तें सुशिक्षितांच्या जगांत इतर हत्याराप्रमाणेंच बोथट झाले आहे. त्यामुळें कांहीहि केले तरी ते करणाऱ्याच्या इभ्रतीला त्यामुळें धक्का बसत नाहीं. पण माझी खात्री आहे कीं, हेच सुशिक्षित अपकीर्तीला फार घाबरतात. रस्त्यांतल्या चार पोरांनीं तोंडावर याचा निषेध केला तरी यांना शल्यें बोचल्याचे दुःख होईल. सामाजिक निषेधा-पेक्षाहि वैयक्तिक निषेध उघडउघड करणें हें सुशिक्षिताच्या बाबतींत फार मोठें हत्यार आहे. "

दामूअण्णा शेवटी म्हणाले. "पाहू—तोहि प्रयोग प्रसंग पडल्यास करून पाहू. मी करतों तें. अगदीं रस्त्यांत ओरडून सांगेन. " हा सत्यवान् आपल्या पत्नीला लाथाडून एका विवाहित स्त्रीच्या उल्लूपणास साथ देत राहिला आहे. "

" शाबास ! असा एक माणूस असला तरी कुजबुजणाऱ्या शेकडो माणसांचें तो काम करील. "

" मी करीन. मास्तर आहे मी. जगाला धडे देणें हें माझें काम आहे. आणि जग ही व्यवहारज्ञानाची शाळा आहे ना ? चांगले फटके मारून शिकवतों एकेकाला. "

" बस ! आपल्याला ही ' डायरेक्ट मेथड ' पसंत आहे. "

---

# " ही माझी बहीण आहे !"

## प्रकरण १३ वें

अरुधतीच्या घरीं आता एक लहानसा अड्डा तयार झाला होता. त्यांत मारुतिराव व सत्यवान् हे दोघे त्या सस्थेचे तहाहयात सभासद झाले होते. त्यांतही सत्यवान् हा खरा निष्ठावत ( ? ) सभासद होता. कुजबुजणाऱ्या जगांत सत्यवानाबद्दल बरीच मोठ्यानें कुजबुज चालू होती.

डॉ. वसिष्ट यांना या गोष्टीची जाणीव होती. परतु त्यांनी अरुधतीबद्दलच्या आपल्या भावना मनातून काढून टाकल्या होत्या. ते दोघे एकत्र रहात होते. परतु त्याचे सबध दोन बिऱ्हाडकरासारखे होते. त्यांतहि ज्यांचे कडाक्याचे भाडण झालेले आहे अशा बिऱ्हाडकरासारखें!

त्यांनी अरुधतीचा कधी निषेधहि केला नाहीं. परतु त्यांच्या मनांत सदैव जळणारे ते एक दुःख होते. ते त्यानी कधीं बोलून दाखवलें नाही; कधी व्यक्तहि केले नाही.

ते विवाहाचा सामाजिक व्यवहार पाळीत म्हणजे सभासमेलनास बरोबर जाणेयेणे वगैरे. आणि पुढेपुढे तेहि त्यांनीं सोडून दिले. लोक येत जात. चहापाणी करीत. गप्पा गोष्टीना रग चढे. डॉ. वशिष्ट त्यावेळीं आपल्या तिसऱ्या मजल्यावरच्या खोलींत शांत मनानें लेखन-वाचन करति.

कॉलेजातहि त्याचे वागणे असेच असे. आपल्या विद्यार्थ्यांत, सहकाऱ्यांत सगळे माहीत झाले आहे, हे माहीत असूनहि ते कधीं दचकले नाहींत. ते समजत, हा माझा पराभव नाहीं. हा अरुंधतीचा पराभव आहे. तिला आपल्या जीवनाच्या शारीरिक डबक्यांतून बाहेर येतां आले नाही.

त्या डबक्यांत सत्यवान् किड्यासारखा जगत होता. त्यांचा बराच

वेळ अरुधतीकडे जाई. त्याला अतिशय आश्चर्य वाटे की, अरुधती आपल्यविषयी इतका आपलेपणा का दाखवते. खरोखरच तिचे आपल्यावर प्रेम होते का? अरुधतीविषयीं मोह बाळगता बाळगता तो तिची कीवहि करू लागला होता.

" काय करणार बिचारी! नवरा हा असा रुक्ष अरसिक मिळाला, घटस्फोट केला तर लोक म्हणावयाचे वसिष्टच चागला आहे. पण या बयेला हे मोती लाभलें नाही. सुशिक्षिताचे असे कित्येक विवाह घटस्फोटाचे दार ठोठावीत आहेत. परतु बाहेर सामाजिक इभ्रतीचा पाहारा पाहून ते घाबरतात आणि गप्प बसतात."

अरुधतीला वाटे, " बरा एक मूर्ख मिळाला आहे! शिकलेला आहे, तेव्हा बोला-चालायलाहि शोभेसा आहे. मला पाहिल्यापासून अगदी झपाटला आहे. एखादे वेळीं नोकरी सोडून माझ्या पायाशीं धरणें घेऊन बसला नाही म्हणजे मिळवली! त्याची सौभाग्यवती माझ्या नांवानें खडे फोडीत असेल. हे असतुष्ट विवाहित संगतसोबत करावयास बरे असतात. विवाहाचे शिरस्त्राण घालून हे समाजात निर्धास्तपणे वावरू शकतात. अविवाहितानी अशी भलत्या ठिकाणीं ये-जा करणे लोकांना खपणार नाहीं, पण याना जणू काय परवाना आहे."

मारुतिराव यांत खरा धूर्त होता. त्याला अरुधतीचा सहवास पाहिजे होता; परतु तो स्वतःची ऐट कोणच्याहि तऱ्हेनें कमी न करता. तो सत्यवानावर नेहमीं चिडे. अरुधतीवरहि त्याबद्दल सतापे—

" हा कारकून का तुमच्या घरात सारखा घोटाळतो?"

" तो माझा मित्र आहे!—"

" मित्र असू द्या हो. पण त्याला मग जरा डागडुजी करून या दिवाणखान्यात शोभेल असा करा कीं! तो येथें बसला की, अगदीं लुळा-पांगळा होऊन बसतो."

" अशींच माणसें बरी असतात. पण तुम्हाला त्याच्याबद्दल एवढा राग येण्याचें कारण ? "

" माझ्या शेजारी त्यानें बसावें, माझ्या बरोबर त्यानें चहा घ्यावा. वगैरे गोष्टींत कमीपणा वाटतो. त्यापेक्षा मी येणें बंद करीन "

अरुधतीच्या अगदीं तोंडावर आलें होतें कीं या ' झेड् ' ला विचारावें कीं " तुम्ही येणें सुरूच का केलेत आधीं ? तुम्हाला कोणी आग्रह केला ? "

परंतु तसें ती म्हणू शकली नाहीं.

ती म्हणू शकणार नाहीं याची मारुतिरावालाहि खात्री होती. कारण तेंच—सामाजिक इभ्रत !

आपला विवाह जुळवून देणारा आहे हा. आपण याला एक प्रकारचें आव्हान दिलें आहे कीं, मी विद्वानाची 'पत्नि' होऊं शकतें हे सिद्ध करून दाखवीन. आपलें वैवाहिक जीवन यास ठाऊक आहे. तेव्हा आपण याला जपलेंच पाहिजे या भीतीनें अरुधती मारुतिरावाला कधीं मनाई करूं शकली नाहीं.

मारुतिरावाचें वागणें मोठें रुबाबदार असे. तो कित्येक वेळा सरळ डॉ. वसिष्ठांच्याकडे जाई आणि आपल्या विविध चळवळींतील समाजनिरीक्षणावर गप्पागोष्टी करीत बसे व शेवटीं अरुधतीची भेटहि न घेतां निघून जाई !

अरुधतीला मारुतिरावाच्या या बेपर्वाईची विलक्षण भीति वाटत होती आणि तो आपल्यावर हुकमत गाजवतो याची तिला फार चीड येई. परंतु त्याला विरोध कसा करणार ? त्याची तोहमत कमी करण्यासाठीं तिनें सत्यवानास हाताशीं धरलें होतें.

सत्यवान् अरुधतीच्या घरीं एखाद्या गड्यासारखा राबत होता ! तो स्वतःचें देहभान विसरला होता. त्याच्यांतील स्वाभिमानाची जाणीव गुंगून पडली होती. त्याची पत्नि—त्याची आई—त्याचे मित्र त्याच्यासाठीं हळहळत होते. परंतु कोणाचें कांहीं सांगणें त्याच्या मनापर्यंत पोहोंचतच

नव्हतें. एखाद्या अनावर विचाराच्या लहरीनें मनुष्य वेडा झाला की, त्याला कांहीं समजावणे जसे अशक्य होते, तसें सत्यवानाच्या बाबतींत झालें होतें.

दामूअण्णाची योजना तयार झाली होती. एक दिवस सत्यवान् आपल्या घरांतून बाहेर पडत होता. इतक्यांत दामूअण्णानीं त्याला थांबविले.

" अरे, सत्यवान् जरा थाब. आम्हालाहि बाहेर यावयाचे आहे. "

सत्यवान्‌ला थांबणे भाग होते.

जरा वेळाने दामूअण्णा खालीं आला. रस्त्यांत सत्यवानाजवळ येऊन पोहोंचला आणि तेथून त्याने हाक मारली, " वहिनी, चला लवकर उशीर होतो ! "

सत्यवान् सर्दच झाला

" तिचे काय काम आहे. "

" मला काय माहीत ? त्याच म्हणाल्या त्याच्या बरोबर फिरायला जायचे आहे. मी म्हटले, मीहि येतो. "

" फिरायला ? वा : ! मीं कामाला निघालो आहे. "

" आपल्याला काहीं माहीत नाहीं ! "

सावित्री अगदी 'फॅशन' ने नटून बाहेर पडली. रुक्मिणी तिला धीर देत होती.

" घाबरूं नका. धिटाईने बोला "

" मी मनाचा निश्चयच केला आहे. सोक्षमोक्ष होईल एकदांचा. चार लोकांसमक्ष त्यांना एकदां सांगू द्या कीं, ही माझी बायको नाहीं, मग मी आहे नि माझें जीवन आहे."

सावित्री बाहेर आली. तिच्या मुद्रेवर करारीपणाचे निश्चयाचें तेज दिसत होतें. सत्यवान् तिच्याकडे क्रुद्ध नजरेनें पाहूं लागला. तिने आपली नजर रेसभरही चळू दिली नाहीं.

सावित्रींतून कांहीं निराळेच सौंदर्य प्रगट होत होतें. 'फॅशन' चा प्रभाव तिच्या रुपावर दिसत होता. सत्यवानूच्या विकृत दृष्टीला तर ती आपली पत्निच आहे याचा विसरच पडला!

" तू कशाला येतेस ?

" तुमच्या बरोबर !

" मला कामाला जावयाचे आहे. "

" मग मी असलें तर काम होणार नाहीं ! सौभाग्यवतीचा सहवास हा तर शुभशकुन आहे. "

" तुला दामू फिरायला घेऊन जाईल !

" तुम्ही असताना मी कशाला जाऊ त्याच्याबरोबर ? "

सत्यवानाचा नुसता जळफळाट होत होता. परंतु भर रस्त्यात पत्नीला धक्के मारून बाजूस लोटण्याइतका तो निर्लज्ज नव्हता, हे दामू-मास्तरना माहीत होते आणि त्याच गोष्टींवर त्याचा सगळा भर होता.

एक अपूर्व योगायोग म्हणजे सत्यवानू—सावित्री रस्त्याने चालूं लागलीं.

सावित्रीच्या अप–टु–डट पोषाखपद्धतीकडे ओळखीचे लोक पहात होते. सत्यवान , सावित्रीचा जमेल तितका उपमर्द नि उपहास करीतच होता.

सावित्रीनेंहि ठरवले होते कीं, आपण आपल्या सेवच्या तपश्चर्येचें फळ आज तपासलेंच पाहिजे.

" नीट चला कीं ! "

दामू मास्तरने उत्तर दिले. " अरे ! वहिनींचा पहिलाच दिवस आहे हा. "

" पण तिला सांगितला होता कोणी हा खटाटोप ? "

" आपणच महाराज ! मला तू यासाठींच घरीं बोलावलेस ना ! "

" माझी फजीति करायला ? "

" का ! फजीती काय झाली त्यांत ? " सावित्री म्हणाली.

" लोक हसतात बघ आपल्याला पाहून ! "

" पण मी पूर्वीसारखी रहात होते, त्यावेळीहि लोक हसत होतेच ! "

" लोकांना या कारभारात मताधिकार दिला कोणी ? तू त्याच्या नादीं लागलास ! लोक काहीं म्हणतहि नव्हते आणि आता म्हणत नाहींतहि " दामू मास्तर म्हणाले.

" दामू तू फितूर झालेला दिसतोस ! "

" फितूर ? तुझ्या पत्नीची बाजू तुझ्यापुढे माडतो हीहि फितुरीच का ? तू घरची लक्ष्मी सोडून गावगगांच्या मागे भटकतोस याबद्दल तुझे अभिनदन केले म्हणजे मग ती मैत्री होईल होय ? "

" माझे आई ! आता रस्त्यात कशाला येथे ? घर आहे की ! "

" घर आहे पण तू कोठे आहेस घरात ? "

" कां ? मी घर सोडले नाहीं काहीं ! माझी गृहलक्ष्मी आहे ना घरांत " सत्यवान् सावित्रीकडे पाहात म्हणाला.

" हो. पण ती गृहलक्ष्मी तुला रस्त्यात आणून दाखवावी लागली. सत्यवान्, माफ कर मी बोलल्याबद्दल, मी तुझ्या मानाने फार कमी शिकलेला आहे. परतु माझे मन मला स्वस्थ बसू देत नाही. "

" अरे झाल आहे काय अस ? मी फक्त हिला जरा आधुनिक जगांत आणतो आहे एवढच. माझ्या बरोबरीची चार मित्रमंडळी घरीं येतात. त्यांच्यांत मिसळावें लागते. तेव्हां हिला कांहीं माहिती असायला नको कां ? "

" मी कोंठें नाही म्हणतो ! वहिनींनींहि तुझ्या म्हणण्याप्रमाणें वागायला सुरवात केली नाही कां ? काय हाल होतात त्यांचे तें स्पेलिंग घोकतां घोकतां ! वास्तविक त्यांना काय करायचें हे करून ? तुझ्या घरीं काय मुंबईच्या गव्हर्नरचा मुकाम आहे कीं, तुझ्या घरांत बायका-माणसांनासुद्धां इंग्रजी आले पाहिजे ? अरे, ज्यांना गव्हर्नर चहा-पार्टीला

नि ज्याना खायला बोलावतो त्यांना सहीसुद्धा करतां येत नसते; मग तुझेच कोण असे मित्र आहेत की ज्याचें मराठीशी हाडवैर आहे ? ”

“ अण्णा, उद्या मी डॉ. वशिष्ट आणि अरुंधती यांना चहाला बोलावणार आहे. मोठी पार्टीच देणार आहे. त्यावेळी ही काय स्वयपाक घरात बसून राहणार ? ”

“ वा: ! काय म्हणून स्वयपाक घरात बसतील वहिनी ? ”

“ मग काय, आडवा पदर खोऊन, पेडाची वेणी घालून, रुपया-एवढे गंध लावून खुर्चीवर मांडी घालून वाती वळत बसणार ? ”

“ तसं कशाला ? अगदी मिसेस अरुंधती वशिष्ट याच्यासारख्या शेजारी बसतील ना ? ”

“ ते मुळात असावें लागते ! ते शिकवून येत नाहीं. ”

“ पण जे येत नसते, येणार नाहीं त्याच्याबद्दल तुझा तरी एवढा अट्टाहास कशाला ? ” दामूअण्णा म्हणाले.

यावर सत्यवान्‌ने कांहीं उत्तर दिले नाहीं; तो नंतर बोललाच नाहीं. दामू मास्तर काही वेळाने परत फिरले आणि सत्यवान् व सावित्री एकमेकाना दबकत रस्त्याने चालत राहिलीं !

सत्यवानास अरुंधतीकडे जावयाचे होते; परंतु सावित्री बरोबर असल्याने त्याचा नाइलाज झाला. कोठे जावयाचें, किती फिरत रहावयाचे हें त्याला कळेना. आणि सावित्रीला तर तो विचार करण्याची जरूरच नव्हती.

रस्त्यात एक ओळखीचे गृहस्थ भेटले.ते सत्यवानास नमस्कार करून पाहात राहिले सावित्रीकडे!

सत्यवानाने त्या गृहस्थांचें आश्चर्य नजरेत ओळखलें. तो चटकन् म्हणाला—

“माझी बहीण आली आहे गावाहून. तिला जरा कांही खरेदी करावयाचे आहे म्हणून—”

“अस्स ! ”

त्या अस्सचा अर्थ काय होता कोणास ठाऊक ? सत्यवानास कळून चुकलें कीं, आपली थाप बरोबर बसली नाहीं.

सावित्री सत्यवानास म्हणाली—

"काय भलतच सागितलत हे !"

"मग काय सांगू? माझी बायको म्हणून जिला ओळखतात तिचे रूप लोकाना चागले माहीत आहे."

"मग लोकांना बहीण हे खर वाटत का ?"

"मला काय करायच त्याच्याशी ?

"मला तुम्हीं झिडकारून का टाकता ?" सावित्री रडकुडीस आली होती.

"झिडकारून ? बरोबर फिरवतो आहे की !"

"बहीण म्हणून ! पत्नि म्हणायला—"

"लाज वाटते मला, किती हिडीस दिसतेस तू या पोषाखात ?"

"तुम्हींच घालायला सागितलेत ना ?"

"पण सवय होण्यापूर्वी तू बाहेर कशाला पडलीस ? आणि पुन्हां माझ्याबरोबर ? घरात राहून माझी बेअब्रू करतेस ती पुरे कीं !"

सावित्रीची घरांत असती तर ती घळघळा रडू लागली असती. जोरानें आलेला अश्रूचा प्रवाह तिने मोठ्या कष्टाने दाबून धरला.

बराच वेळ कोणीहि कांहीं बोलले नाही.

"चलायच परत ?" सावित्री म्हणाली.

"झाली कां फिरायची हौस ? पुरी करून घ्या एकदा. अनायासें योग आला आहे."

सावित्री व सत्यवान् घराकडे परत वळले. घर जवळ आल्याबरोबर सत्यवान् सावित्रीला म्हणाला—

"जाशील ना आतां सुरक्षित ?"

"तुम्हीं ?"

"मी काय तुला फिरवून आणण्यासाठीं बाहेर पडलो होतों ?

श्रीमंतांचीं मुलें किंवा कुत्रीं फिरवून आणणारी गडीमाणसे असतात, त्यांपैकीं वाटलों काय मी तुला ?

" सावित्री मुकाट्याने घरीं आली. तिला ब्रह्मांड आठवले ! घरीं आल्याबरोबर रुक्मिणी तिच्याकडे धावतच गेली.

तिला पाहिल्याबरोबर सावित्रीने तिच्या गळ्यांत मिठी मारली. त्या अगदीं बहिणीसारख्या एकमेकींशीं वागत असत.

" काय झाल सावित्री ? "

" काहींही होत नाही. होण शक्य नाही. " झाल ते चुकत नाहीं. अशी माझी खात्री झाली.

" काही बोलले का तुम्हाला ते ? "

" माझ्याशी बोलू नकोस असें स्पष्ट सांगितलें नाहीं, एवढेंच ! "

" तू भांडली नाहीस ना त्याच्याशीं ? "

" मी ? तुला शक्य वाटत का रुक्मिणी हे ? मला वाटत हाच माझा दोष असावा, एखाद्यावेळीं अस मनात येत—" सावित्रीला पुन्हा हुंदका आला.

काय ? काय ? सावित्री काही वेडवाकड— "

" काही वेडवाकड नाहीं. अगदीं सरळ त्यांना विचारावसं वाटत कीं, तुमच्या पत्नीवर प्रेम करणारा एखादा—! नको, मला सहनसुद्धा होत नाहीं ते. ! "

" त्याच विवाहापूर्वी प्रेम होत का अरुधतीवर ! "

" मला काय करायचय ? हे विवाह करणारांनीं पाहावयास नको का ? आणि हें कोणावर प्रेम करतात—एका विवाहित पत्नीवर ! तीसुद्धा माझ्यासारखीच आहे. रुक्मिणी ! माझी नि त्या अरुधतीची भेट होईल कां ग कधी ? "

" काय करणार आहेस भेट घेऊन ? "

" मी तिला सांगेन सार. तिला कल्पना नसेल कीं, तिच्या छांदिष्टपणानें माझ्यासारख्या एका बापडीच्या ससाराच मातेरें होतें

आहे. माझी खात्री आहे, तिला ग्वात्रीने माझी दया येईल. स्त्री आहे ना ती ? ”

“ पण शिकलेली आहे. एम्. ए. आहे असे ऐकते ! ”

“ आणखी शिकली तरी शिक्षणाबरोबर ती काय पुरुष होत जाईल ? शिक्षणानें पुरुषातला पुरुषीपणा कमी होत नाहीं. मग बायकाचा तरी स्वभाव कसा बदलेल ? ”

“ मला समजत नाही बाई काही ! पण ऐकते तें सांगितले. पण तुझ्या भेटण्याचा चागला परिणाम होईलसे मला वाटत नाही ! ”

“ वाईट नाही होणार ? ”

“ वाईटही होईल कदाचित्. सत्यवानास कळले तर जास्तच चिडेल ! ”

“ चिडू देत, मला मारतील ना ? ठीक आहे. ते सुखानें घरीं न येतां चिडून आले तरी हरकत नाहीं. पण बाहेर गेल्यामुळे त्याची जी बदनामी चालू असेल, ती तर थाबेल ! ”

“ बायकोला मारणे हा चागला लौकिक आहे वाटत ? ”

“ बायको सोडून ‘ घराबाहेर ’ हिंडण्यापेक्षां पुष्कळच चागला आहे. ”

“ धन्य आहे तुमच्या पुढे ! ”

“ असं तुला वाटत, कारण तू स्त्री आहेस. पुरुषाच्या जगात मी बावळटच ठरले ना ? ”

“ पण आतां कोण बावळट म्हणेल तुला ? आता तू शिकू लाग-लीस. फिरायला जाण्यापूर्वी तू किती चागली दिसत होतीस. नखरा आणि सौंदर्य यांतला फरक मला त्या वेळीं कळला ! ”

“ त्या नव्या सौंदर्याची सजावट मी त्यांच्यासाठींच केली ना ? पण बायकोला नटण्यामुरडण्याच्या नादीं लावून ते आपल्या ‘ नादां ’त गुंग झालेत. कोणासाठी मी ही यातायात करतें आहे ?

“ येईल, यालाही फळ येईल. देव कांहीं झोपला नाहीं ! ”

---

# घरांतला नंदादीप

## प्रकरण १४ वें.

सत्यवानाच्या घरी मोठी गडबड चालली होती. सध्याकाळीं अरुधती आपल्या पतीसह फराळास येणार होती. काही मित्रही येणार होते.

सकाळपासून सत्यवान् सावित्रीचा छळ करीत होता. अशी उभी राहू नकोस. फिदी फिदी हसू नकोस. खुर्च्या पाहून इतकी गांगरशील की मटकन् सतरजीवरच बसशील. टेबलावरून घास घेताना अंगावर सांडू नकोस---''एक ना दोन !''

पण शेवटीं सावित्रीने करावयाचे ते केलेच.

सर्व मडळी आली होती. सावित्री तेथे आल्याबरोबर दामू मास्तर उठून म्हणाला---

" या मिसेस सत्यवान् " !

" नमस्कार, सर्व ओरडले ! "

आणि अगदीं नेहमीच्या सवयीप्रमाणे सावित्रीने सर्वांना वाकून नमस्कार केला !

तेथे दुसरे कोणी नसते तर सत्यवानाने सावित्रीला तेथल्या तेथे---

परतु दुसरे कोणी नसते तर सावित्रीने नमस्कारहि केला नसता.

डॉ. वसिष्ठ व सावित्री या दोघांची सर्व मेजवानीभर थट्टा चालली होती.

डॉ. साहेब तेथे आले तों थेट भिंतीत असलेल्या पुस्तकाच्या कपाटाजवळ गेले.

अरुधतीने ते पाहिल्याबरोबर ती तिकडे ताडताड गेली आणि त्यांच्या हातांतले पुस्तक हिसकावून घेऊन त्याना जागेवर नेऊन बसविले.

सत्यवान् सावित्रीवर सारखी नजर ठेवीत होता आणि तो डोळे फाडून पाहात असल्याने सावित्री जास्तच चुकत होती.

डॉ. वशिष्टांनीं त्या बाष्कळाच्या थट्टेकडे लक्षच दिले नाहीं. आपल्या पत्नीनें पाळलेले हे सगळे गुलाम आहेत एवढेच त्यानीं ओळखलें.

सावित्रीने मात्र मडळींची खूप करमणूक केली. सत्यवानाखेरीज बाकी सर्वजण त्या थट्टेत भाग घेत होते. सत्यवान् क्षणोक्षणीं सतापून लाल होत होता.

दामू मास्तर सावित्रीला साभाळून घेण्याची पराकाष्ठा करीत होता. परतु बाकीच्या माणसांच्या इरसालपणापुढे सावित्रीचा किती बचाव होणार ?

शेवटीं सत्यवानाला आपल्या गृहलक्ष्मीचे हाल पाहवेनात म्हणून तो काही तरी निमित्त काढून अरुधतीजवळ जाऊन बोलत बसला.

इतर मडळी खात होती. डॉ. वशिष्ट वाचीतवाचीत बोलत होते. सत्यवान् खाण्याचे निमित्त करून अरुधतीशी बोलण्यासाठीं धरपडत होता. आणि अरुंधती झेड्. मारुतिरावाला बोलतांबोलतां अडवून नामोहरम करण्याचा प्रयत्न करीत होती.

इतक्यांत टोले वाजले.

डॉ. वशिष्ट एकदम म्हणाले—“ काय सत्यवान् ! झाल ना सगळ यथासांग ! ”

“ चालल आहे अजून, अद्याप झाल नाहीं ! ”

“ तुम्हांला घाई आहे कां ? ” अरुधतीने रोखून विचारलें.

“ हो. मला गेले पाहिजे. ”

“ मग सत्यवान् ! ” त्याना परवानगी द्या ना. अरुधतीचे हे शब्द ऐकून सर्व थक्क झाले.

“ माझ्या परवानगीसाठीं वशिल्याची जरूर नाहीं. तुमचे चालूं द्या. मी जातें. ”

अरुंधती गप्प बसली. तिला हा अपमान सहन झाला नाहीं.

डॉ. वशिष्ट निघून गेले. कोणालाही वाईट वाटले नाहीं त्याबद्दल. याचे दामूमास्तराना फार आश्चर्य वाटल.

रुक्मिणी आतून हे पाहात होती. सत्यवानाची आईही दाराआड होती.

रुक्मिणी म्हणाली, " पाहिलत आई ! आपल्या नवऱ्याची चार लोकांत जी इतकी शोभा करते ती घरी काय करीत असेल ? "

" माझा पोरीच्या ससाराच वाटोळ केल सटवीन ! काय करू ? आपली पोर आपल्या ताब्यात नाहीत. इतराना बोलून काय उपयोग ? "

सावित्रीन उखाणा घ्यावा अशी मडळींची लहर लागली.

आणि तिने मडळीच्या व विशेषतः अरुधतीच्या आग्रहाखातर उखाणा घेतला. पण तिचा जास्तच उपहास झाला. सत्यवानास आता हे सहन होईना.

त्याने हाताने खूण करून सावित्रीस जावयास सागितले आणि सावित्री उठून जाऊ लागली.

जातांजातां सर्वजण म्हणाले " गुड इव्हिनिंग मिसेस सत्यवान् !"

दामूमास्तराला वाटले, आपण उठावे आणि सावित्रीच्याऐवजी उत्तर द्यावे. सावित्री चुकणार हे ठरलेले होते. तिला वाटले लोक सत्यवानास म्हणतात.

ती काही न बोलता निघून गेली.

मडळीही काहीं वेळाने उठली.

अरुधती एकीकडे आहे असे पाहून सत्यवान् तिला एक फूल द्यावयास गेला.

परतु तेथे झेड्. मारुतिराव तिच्याशी बोलत उभे आहेत; हे पाहि-ल्यावर तो आश्चर्याने थक्क झाला. मारुतिरावचा त्याला सताप आला. परंतु तरी तो हसत हसत तेथे गेला.

मारुतिराव बाजूस सरकल्यावर सत्यवान् फूल पुढें करीत हळूच म्हणाला—

" माफ करा अ ! तिला बाहेर बोलावल नसत तर बर झालं असत !"

" का ? त्यानी काय पाप केल ? घरातल्या समारंभाच्या वेळीं बायकोला बंदी करणार ? " अरुंधतीने उत्तर दिले.

सत्यवानाने या उत्तराची कधींच अपेक्षा केली नव्हती. तो गप्पच बसला.

अरुंधतीने त्याच्या हातातले फुल घेऊन त्याचा वास घेतला. हातांत खेळवले आणि दाराशी जाताजाता सत्यवानाच्या कोटाला लावून दिले !

मारुतिराव हे पहात होता. सत्यवान् सगळा राग विसरला आणि त्या फुलाच्या पाकळ्या कुरवाळू लागला.

सर्वजण गेल्यावरही सत्यवान् त्या फुलाशीच खेळत बसला.

सावित्री तेथे आली. तिला पाहिल्याबरोबर त्याचे डोळे लाल झाले. तो एकदम तिच्या अंगावर ओरडला. " चल ! "

सावित्री इतकी भेदरली की एक किंचाळी मारून ती बेशुद्धच पडली.

सत्यवान् तिच्या निश्चेष्ट देहाकडे पाहातपाहात तेथून निघून गेला !

त्याची आई पुढे धावत आली व त्याला म्हणाली "कुठ चाललांस? बायको समोर बेशुद्ध पडलेली दिसत नाही तुला ? "

" होय ना ? तिच्या डोक्यावर पाणी ओतायला घेऊन येतो. म्हणे कुठ चाललास ? वाटेल तेथे ! "

" सत्यवान ! तुला का ही अवदसा आठवते आहे ? घर घर करीत जगात हजारो निराश्रित रस्त्यावर मरत पडतात. आणि तूं भरल्या घरातून जातोस ? तुला तुझ्या पायाशी पडलेले सुख नि समाधान दिसत नाहीं ? "

" मी पायाशी पडलेले सुख उचलण्यासाठी वाकावयास तयार नाहीं.

ठीक आहे. पुष्कळ वाट पाहिली इतक्या दिवस. मला सांपडली आहे वाट यांतून बाहेर पडण्याची सुटण्याची. आई, सत्यवान् सुटला आतां!"

"सत्यवान्! तू परत येईपर्यंत या घराचीं दारें उघडीं राहतील. माझे डोळे मिटतील पण दारें उघडीं राहतील. कोठे ठेचाळलास आणि विव्हळून 'आई' म्हणून हाक मारलीस तर लक्ष्यात ठेव तुझी आई या उबऱ्यावर प्राण जाईपर्यंत तुझी वाट पाहात खिळून बसली आहे" पण सत्यवान् थाबला नाहीं! आईच्या प्रेमाचा नदादीप त्याला दिसला नाही.

---

# घराकडे

## प्रकरण १५ वें

सत्यवान् घरून निघाला तो थेट अरुधतीच्या घरी आला. त्या वेळीं डॉ. वशिष्ट आणि अरुधती याचे कडाक्याचे भाडण चाललें होतें.

" मला दिल्लीला गेलेच पाहिजे, आणि मी जाणार ! "

" मग लग्न कशाला केलत ? "

" तुला रावण करण्यासाठी ग्वात्रीन नाही. "

इतक्यांत सत्यवान् तेथे आला. तो डॉक्टराना म्हणाला--

" डॉक्टर, ऐका ना पत्निच एखाद्या वेळी तरी. "

" ओ हो. तुम्ही सागतां होय ? पण माझ्या इच्छेचा प्रश्न आहे त्र. तेथें कोणी सांगायची जरूर नाही नि कोणी ऐकावयाचेंहि नाहीं. "

" सत्यवान् जाऊ द्या त्याना ? "

" मी कोठे आडवतो आहे. "

" ह तुमच सामान तयार आहे. गणू मोटार घेऊन ये जा. त्याची गाडी चुकेल. "

" तुम्हीच त्याना घालवता ? " सत्यवान् हळूच सावित्रीला म्हणाला.

डॉ. वशिष्ट जाता जाता सत्यवानाकडे पाहात म्हणाले " येतो ह. पाहात राहा घराकडे मधून मधून " " जरूर. काहीं काळजी करू नका "

डॉ. वशिष्ट गेल्याबरोबर अरुधती सत्यवानाकडे वळून म्हणाली.

" तुम्ही त्याना सांगता, काही काळजी करू नका ? "

" हो. मग काय सांगू ? "

" त्यांना काळजी आहे कोठें ? "

" पण आम्हांला आहे ना ? "

" कोणाची ? माझी ? कोण तुमची मी ? आणि तुम्ही कशासाठीं माझी काळजी करता ? "

सत्यवानाला वाटले ही थट्टा आहे. पण थट्टा नसली तर—पण ती थट्टाच होती.

अरुंधती लगेच सत्यवानाचा हात हातात घेऊन त्याला दिवाणखान्यात ओढीत आणीत म्हणाली.

" बसा. सत्यवान् ! डॉक्टर येईपर्यंत तुम्ही ब्रह्म नि मी माया "

सत्यवानाला हे ऐकून सुखाची गुंगी येते आहेसे वाटूं लागलें. हातीं आलेल सुख बेकायदेशीर असले तरी ते उपभोगण्याची ऐट त्याच्यात नव्हती. अरुंधतीचा सहवास हे सुख त्याला अवजड झालें आणि त्याच्या भाराखालीं तो लुळा पांगळा होऊन पडला होता.

डॉ. वशिष्टाच्या गैरहजेरीत सत्यवानाचा मुक्काम जवळ जवळ नेहमीं अरुंधतीकडेच होता. डॉक्टर वशिष्ट ही व्यक्ति येथें कधीं आलीच नाहीं असें त्या घरावरून एखाद्याला वाटले असते. त्याच्या अस्तित्वाच्या, काहींही खुणा अरुंधतीच्या जीवनात नव्हत्या.

सत्यवानाला ती गड्याप्रमाणे वागवीत होती. आपल्या सौंदर्यानें व सहवासाने त्याला धुंद करून ती लाथाडीत होती.

परंतु तिच्यावर अनधिकाराने जरब गाजविणारा एक 'हिटलर' होताच : तो म्हणजे मारुतिराव !

डॉ. वशिष्टाचे व अरुंधतीचे भांडण चालू होतें; त्यावेळीं तो घराजवळून गेला आणि नंतर दुसऱ्या दिवशीं तो अरुंधतीकडे गेला.

" काय, डॉक्टर दिसत नाहीत कोठें ? "

" दिल्लीला गेलेत ! "

" आं ! केव्हा ? अन् एकटेच ? एम्. ए. बायको करूनहि हा मुनि एकटाच वणवण करतो का ? तुमची त्यांना काही मदत होत नाहीं. "

" त्याना नको आहे ती ! "

" कां, तुम्हाला वेळ नाही मदत करायला ? "

" म्हणजे ? स्पष्ट झाला की—"

" वेळेवर तुम्हांला मदत करावयास मी येईन ! "

" आतां मदत करायलाच आलांत ? "

" हो. मला किती नि काय वाटत तें सांगायला आलो आहे. "

" मी असहाय झालें असे समजू नका. "

" हे सांगायला नको कुणी मला. "

" मुळीच नाही. तुम्ही समर्थ आहांत, स्वतंत्र आहात. "

" हे सांगायला नको कुणी मला. "

" नाही. माझं वाक्य पुरं होऊं द्या मला तसं वाटत होतं. आता असं वाटतं, तुम्ही मूर्ख आहांत. तुम्ही पत्करलेलं लग्न हा त्या मूर्खपणाचा पुरावा आहे. "

" मला तसं वाटलं तर मी या मूर्खपणांतून मोकळी होऊ शकेन!"

" तेच सुचवायला आलो आहे. तशीच वेळ आली तर कळवा. पुन्हा एकादा डॉक्टर—आता खराखुरा डॉक्टर देईन. अगदीं बाटलीवाला. "

" तुम्हीं माणूस आहांत का ? "

" रागावलात ? " मारुतिरावानें एकदम आवाज उतरवला.

" कारण काय रागवायचें ? "

" मला कींव येतें तुमची ! "

" कशाबद्दल ? मला कोणाची कींव नको "

" राहिल. तुमची प्रतिज्ञा आठवते तुम्हांला ? "

" होय. एका बेजबाबदार माणसाच्या नादीं लागून मी केली होती ती प्रतिज्ञा. "

" कोण बेजबाबदार ? "

" तुम्हीं—तुम्हीं मला फसवलंत ! "

" हो हो ! तुमची डिग्री विसरू नका. शोभत कां हे एम्. ए. स्त्रियांना

एम्. ए. स्त्रीला फसवल याबद्दल लोक माझी स्तुति आणि तुमची कींव करतील. अस पाहा. मी जाणूनबुजून दलाल माणूस आहे. तुम्हीं माल मागितलात, मी दिला. तुम्हाला सागितलें होतें मी आणि नतर सांगितलेंहि माझ्या लक्ष्यांत आहे !"

"काय—काय सागितलें होते ते सागा !"

"तुम्हाला काय वाटतं ?"

"शका वाटते."

"मग नक्की माणूस आहे. अरुधती— !"

या एकेरी हाकेनें अरुधतीच्या अगावर काटा आला. मारुतरावचे सर्व अतःकरण त्यात एकवटले होते. कात टाकल्याप्रमाणे मारुतिरावची चर्या बदलली.

इतक्यात सत्यवान् तेथ आला.

"सत्यवान् जरा काम करता एक ?"

"काय ?"

"तुम्ही येथे उभे राहू नका. आपल्या घरी जा. कामात आहे मी."

सत्यवान्च्या डोळ्यापुढ काजवे चमकू लागले.

मारुतरावकडे तो पाहू लागला.

मारुतिरावने थोडे पुढे होऊन म्हटलें—

"कळले का सत्यवान् ? घरी जा. ज्याना घर असतात त्यानीं आपापल्या घरीं जावे. मूर्खा ! आ करून पहात काय राहिलास ?

सत्यवान् वरती गेला त्यावेळी जिवत होता. कीं खालीं आला त्यावेळीं जिवत होता ? खाली आला त्यावेळीं ते त्याचे भूत होते !

आणि काहीं वेळानतर त्याच्यातले इतक्या दिवस दबलेलं मन ओक्साबोक्शी रडू लागले!

गांवातल्या एका सार्वजनिक बागेत तो गेला आणि तेथ तोड धुण्याच्या निमित्तानें एका ओढयाच्या कांठी जाऊन व तेथे त्यानें मनसोक्त अश्रु ढाळले.

---

# घर आणि गृहिणी

## प्रकरण १६ वें

त्याची पत्नि सावित्री त्याचवेळीं आपल्या घरीं अश्रु ढाळीत बसली होती.

सत्यवानास सुबुद्धि मिळावी, तो ससारांत परत यावा म्हणून त्याच्या आईने 'सत्यनारायण' करण्याचे ठरविले होते.

तो सत्यनारायण चालू होता. दामूमास्तर आणि रुक्मिणी ही पूजेला बसली होती. आई भाविकपणाने पोथी ऐकत होती. तिच्या डोळ्यांतून घळघळ पाणी वहात होते. घरात लेक सून असून आज पूजेसाठी माल-

दामू मास्तरांचें मन श्रद्धेने तुडुब भरले होते. त्यांने पूजेला बसतांना आईला सागितले होते.

"आई, पहा पूजेला बसतो आहे. नमस्कार करतो तुम्हाला आशिर्वाद द्या. पोथी आटपावयाच्या आंत सत्यवान् दाराशी आला पाहिजे. सत्यवानाला प्रसाद दिल्याखेरीज मी प्रसाद घेणार नाही.

" दामू, देवाला असं सकटात घालू नये.

" देवानेंहि आपला देवपण सोडू नये.

दामुअण्णा सावित्रीकडे गेला. तिलाहि त्याने नमस्कार केला. आणि मग तो म्हणाला—

" वहिनी, रडत बसू नका. माझें मन मला सागते आहे सत्यवान् निघाला आहे. "

" तुमच्या तोंडांत साखर पडो. "

" नाहीं—आधीं सत्यवानाच्या तोंडांत प्रसाद पडो. "

मी प्रतिज्ञा केली आहे. तुम्ही अशा बसू नका. तुम्ही त्या दिवशी सारखा पोषाख करून बसा. नाहीं तर तो पुन्हां चिडून जाईल. अगदी अप-टु-डेट हं. रडायचं नाहीं. सत्यवान् निघाला आहे.

आणि दामुअण्णाने घातलेल्या संकटास देव खरोखरच घाबरला.

सत्यवानाच्या घरीं लोकाची प्रसादासाठीं ये—जा चालली होती. त्याच वेळी सत्यवान् घराच्या मागच्या बाजूनें चोरासारखा घरांत शिरत होता.

तो सरळ आपल्या खोलींत जाऊ लागला. दामु अण्णांचें मन व्याकूळ होत होते.

लोकाची गर्दी कमी होऊ लागली. आणि त्याचे मन सैरावैरा भटकू लागले.

त्याचे डोळे गरगररा फिरू लागले. इतक्यात पलीकडच्या बाजुच्या दारांतून सत्यवान् जिना चढत असतांना दिसला.

त्याचें मन भुरकन् उडाले आणि मग शरीरही धावत सुटलें.

तो आधीं काही न बोलतां, पाऊल न वाजवतां दुसऱ्याच एका जिन्याने सावित्रीकडे गेला.

त्याने दाराची कडी हळूच वाजवली.

सावित्रीला झोप लागली होती. ती खडबडुन उठली.

" वहिनी ! "

" ओ ! आलेत का हो ? "

" हो—होय. तयार रहा. अस स्वागत करतां, कीं, तो सर्दच झाला पाहिजे. इकडेच येतो आहे तो. "

सावित्रीने सर्व अक्कल खर्चे करून कमालीच्या नटवेपणानें आपली वेषभूषा केली आहे. फक्त आनंदित होणें तिला जमत नव्हते. पण ते एका क्षणार्धात जमलें !

परतु काही वेळानें सत्यवान् ज्या दालनापर्यंत आला तेथे त्याला आई दिसली. त्याचें पाऊल पुढें हलेना.

तेथुनच त्यानें आरोळी मारली " आई "

" सत्यवान् "

" भावजीऽ "

" मी [illegible]रीं आलों आहे. आई ! आई माझें घर [illegible]
मला घरांत घे आई ! मी वाट चुकलो होतो. "

सर्वांच्या डोळ्यांत अश्रुधारा उभ्या राहिल्या, दामूमास्तरनें वर आऊन सावित्रीस हाक मारली. मग तो सत्यवानास म्हणाला.—

" घरीं आलास ना ? मग गृहिणीला भेट ना !

सावित्री पुढे येत होती.

सत्यवान् एकदम खेकसला—" कोण तू ? सावित्री ? माझी सावित्री मला पाहिजे. उतर तो पोशाख. आधीं उतर. माझी सावित्री या पोशाखांत, या नटवेपणात गुदमरते आहे. मी माझ्या घरीं आलो आहे. मला माझ्या गृहिणीला अर्धाङ्गीला सावित्रीला डोळे भरून पहावयाचे आहे. "

सर्वजण सत्यवानाकडे पयात राहिले. दामू मास्तराचा आनद गगनात मावेना. तो सावित्रीस म्हणाला,

" वहिनी ! आधीं हे सोंग उतरवा ! आणि सती सावित्रीसारखा अर्धाङ्गीसारखा पोशाख करून आधीं या गुरूजीचा पाया पडा. आशिर्वाद तयार करतो तोपर्यंत "

